# गुलशन

[लघुकथासंग्रह]



लेखिका

सौ. रत्नप्रभा म्हाणे, बी.ए.

卐

मूल्य २ रु.

# कथानुक्रम







# १

# हृदयांतलें चांदणें



वत्सलाबाई पुढच्या खोलींतून उठून मधल्या खोलींत आल्या. त्यांनीं इकडे तिकडे पाहिले. सगळीकडे पसारा पडला होता. त्यांचा मोठा मुलगा मधुकर टेनिस खेळायला जाताना बदललेले कपडे तसेच टाकून गेला होता. टेनिसच्या रॅकेटचा प्रेस नीट जागेवर नव्हता. अन् टांचेवर फाटलेले दोन जुने पायमोजे खिळ्यावर वांकडेतिकडे लोंबत होते. खालीं अंथरलेल्या सतरंजीवर त्यांच्या चिमुकल्या नातवाचा खेळ इतस्ततः विखुरला होता. कोपऱ्यांतल्या स्टुलावर परटाकडनं आलेले कपडे अव्यवस्थितपणें ठेवले होते.

तो सारा पसारा पाहून वत्सलाबाईंच्या कामसू वृत्तीला बरें वाटलें नाहीं. एरव्हीं त्यांनीं ओचापदर खोवून तो पसारा चटकन आवरून टाकला असता. पण आज? त्यांच्यां हृदयमहालांतही असाच विस्कळीतपणा माजला होता. भावनेची अधिष्ठात्री देवता नाराज झाली होती. विचारांचे भालदार अन् चोपदार रुसून बसले होते. विवेकाचा राजदंड कोपऱ्यांत बसला होता. अन् दिवसभर होणारे कामकाज हस्तमंत्र्यांनीं आज पार पाडले नव्हते.

म्हणूनच तो सारा पसारा पाहून त्या चटकन् कामाला लागण्याच्या ऐवजीं तिथेच सतरंजीवर बसल्या पण त्यांना तिथे बसवेना, पुन्हा त्या

पुढच्या खोलींत आल्या. विनायकरावांच्या टेबलावरचीं दोन–तीन मासिकें त्यानीं एकवार चाळलीं. काल संध्याकाळपासून त्यांना बेचैन करणारी ती "यशवन्त" मासिकातील गोष्ट! तिकडे लक्ष द्यायचे नाही असा विचार करून त्यांनीं मासिक बद करून टाकले पण तरीही त्याच्या मनश्चक्षू-समोर राईमळ्यातल्या त्या रानवट अनुनयाचे चित्र सारखे दिसूं लागले.

त्याच्या लग्नाला आता चोवीस वर्षें झालीं होती, चौदा वर्षांची बावर-लेली वत्सला अन् अठरा वर्षांचे विनायकराव, ते सजवलेले बोहले, अंगाला लावलेल्या हळदीचा पिवळाभडक रंग, कपाळावरून खालीं गालावर रुळणाऱ्या त्या अवजड मुंडावळी. ताशांचा कडकडाट अन् बायकांचा बजबजाट.

त्या विमनस्क स्थितींतही वत्सलाबाईंना हंसू आल्यावाचून राहिले नाहीं.

चोवीस वर्षांपूर्वींचा तो काळ अन् त्यावेळीं होणारीं तीं लग्नं! तेव-ढ्यांत त्याना आठवण झाली. आज संध्याकाळीं सुनीति त्यांच्याकडे येणार होती, सुनीति! त्याची एक दूरची भाची अन् मधुकरची वाग्दत्त वधू! त्यांच्या मनाने पुन्हां विचार केला—'खरच आजकालची लग्नं अन् त्यांचीं विविध स्वरूपं किती वेगळीं! सुनीतिचच पहा ना! दोन वर्षांपासून सुनीतीचे वडील इथं बदलून आले अन् तेव्हांपासून सुनीति त्यांच्याकडे वरचेवर येऊं लागली. दोन वर्ष त्या तिला जवळजवळ रोज पहात होत्या रोज तिला पाहून—तिचा प्रेमळ अन् कामसू स्वभाव पाहून त्यांना तिच्याविषयीं एक प्रकारचा लळा वाटायला लागला होता अन् रोज पाहूनही मधुकरला तिच्यांत एक प्रकारचे नावीन्य रोज दिसून येत होते! अशा रीतीने जमलेले ते लग्न!' ..

पुन्हां त्याचे मन स्वतःच्या आठवणींत गुतले ..

लग्नानंतर जवळ जवळ एक महिन्यानतर त्यानी आपल्या पतीशी मनमोकळेपणाने बोलण्याचा प्रयत्न केला होता. पण तोही किती अड-खळत, घामेजत अन् बावरत ! पण आता आजच्या काळात मधुकर त्यांना सरळ सागू शकतो. “ आई, नीतिला उद्यां आईस्क्रीम खायला बोलावशील ना ? ”

त्याना हसू आले. काळ बदलला—मने बदलली–विचारसरणी बदलली अन् चालीरीतीही बदलल्या.

हे वारे शहरापुरतेच वाहात नाहीं. खेड्यांतसुद्धा चालणारा तो रानवट अनुनय ! निसर्गाच्या सान्निध्यात वायूच्या अवखळ हिंदोळ्यावर विखुरलेली तीं प्रेमसुमने– ! तो हृदयें थरारून सोडणारा अनुभव ! ती मनाला सतत झुरणी लावणारी विलक्षण अनुभूति ! अन्तःकरणाला गुदगुल्या करणाऱ्या प्रेमबोलांचे ते गोड गुंजारव ! त्यांनी ह्यांची गोडी कधीही चाखली नव्हती– त्या उत्कटतेची जाणीव त्यांना कधीं झाली नव्हती !

वत्सलाबाईंची नजर घड्याळाकडे गेली. सुनीति येण्याची वेळ झाली होती अन् बाजारांत गेलेली वीणा--पण त्याची मुलगी–देखील येण्याची वेळ झाली होती.

त्यांच्या मनानें त्यांना उठण्याची आज्ञा केली पण हृदयाने ती तात्काळ झिडकारून लावली. त्यांचे नेत्र पुन्हां टेबलाकडे वळले. टेबलावरचे ते नक्षी काम केलेले टेबलक्लॉथ . .. .त्यांच्या लग्नानंतर त्यानीं देखील असेच टेबलक्लॉथ केले होते. अन् विनायकरावांनीं ते पाहिल्यानंतर त्याची स्तुति केली होती. पण किती मोजक्या शब्दात ! “ अरे वा ! फार सुन्दर ! ” हे त्यांचे शब्द त्यांना उत्तेजन द्यायला पूर्णपणे समर्थ होते. त्या उत्ते-

जनाच्या साथीने त्यांच्या हृदयसारंगीवर आनन्दाची लकेर झंकारून गेली होती. अन् पौर्णिमेच्या चंद्रासारखे त्यांचे हृदय उजळून गेले होते.

त्याच्या मनात विचार आला, कीं आजकालच्या मुलामुलींना नाहीं तरी बोलणेच फार! परवांच पहा ना! सुनीतिने दुपारपासून मेहनत करून म्हैसूरपाक केला होता. पलिकडच्या खोलींत बसलेल्या मधुकरला तिने बशी भरून नेऊन दिली अन् हलक्या आवाजात विचारले, "पहा, कसा झालाय् तो!"

अन् यावर खदखदून हंसत मधुकर म्हणाला, "वा! वा! वा! ते काय विचारणं? आमच्या भावी राणीसरकारांनीं केल्यावर मग काय तो वाईट होणार आहे?"

थोड्या शब्दांनीं स्तुति व्यक्त होत नाहीं असे ह्यांना वाटते कीं काय कोण जाणे! स्तुति ही मधासारखी असली तरी त्याच्या अल्पस्वल्प बिंदूतली माधुरी कुठे अन् बाटलीभर मधाची वीट आणणारी गोडी कुठे!

सहा वाजायला दहा मिनिटे होतीं. मधुकर येईल, सुनीति येईल अन् वीणा देखील येईल. अन् बाहेरच्या गॅलरींत तिघेजण खुर्च्या टाकून बसतील. एवढंच काय पण वत्सलाबाईंना देखील बोलावतील. त्या जाणार नाहींत. पण चिमुकला सतीश त्यांचा पदर धरीत बोबड्या स्वरांत म्हणेल, "आजी, चल ना ग भायेल! आई तुना बोलावते हाये—चल लवकर लवकर—" अन् सतीशच्या आग्रहाखातर त्या बाहेर जातील. सुनीति चटकन् उठेल अन् त्यांना खुर्ची देईल. पण वत्सलाबाई गॅलरींतून दिसणाऱ्या दूरवरच्या रस्त्यावर बघतील अन् एका हातांत छत्री अन् दुसऱ्या हातांत कागदपत्र ठेवण्याची कातडी बॅग घेऊन येत असलेले विनायकराव

दिसले न दिसले की त्या चटकन आल्यापावलीं परततील अन् चुलींत लाकूड सारून चहाचे आधाण ठेवतील.

हा त्यांचा नेहमींचा अनुभव होता!

लग्न होऊन कितीतरी दिवस झाले तरी त्य. विनायकरावांशी कुणासमोर बोलत नसत. अन् मधुकर चांगला वर्षाचा झाला तरी दोघेजण त्याचे उघड असे लाड करीत नसत. विनायकराव आले कीं बसलेल्या वत्सलाबाई चटकन् दाराला चिटकून उभ्या राहात. अन् त्यांची सासू मग ह्या आज्ञाधारक अन् सालस सुनेकडे जराशीं चांगुलपणाने पाही. पण आजच्या काळांत मात्र सुनीति मधुकरसमोर बसते, मोकळेपणाने चर्चा करते—हास्यविनोद करते अन् प्रसंगीं त्याची थट्टाही करते.

तेवढ्यात जिन्यावर पावले वाजलीं. वीणा अन् सतीश बाजारातून आले होते. लगेच पुन्हा जिन्यावर पावलांचा आवाज आला अन खाड् खाड् बूट वाजवीत पोष्टमन आला. वीणा उत्कंठेने एखाद्या लहानग्या बालिकेप्रमाणे धावली. अन त्याच्या हातातले पत्र घेऊन त्याकडे निरखून पहात सतीशला म्हणाली, "बंड्या, ये ये लवकर अरे तुझ्या बाबांचं पत्र आहे. आता आपल्याला न्यायला येतील ते. हो! ये की रे!"

वत्सलाबाई माहेरीं गेल्या की त्यांना परत पाठविण्यासाठीं विनायकराव त्यांच्या श्वशुरांना पत्र लिहीत. "सौभाग्यवतीस पाठवून देण्याची व्यवस्था व्हावी." अन मग त्याची सासरी पाठवणी होत असे. पण वीणेला न्यायला येणारे वसन्तराव, ते आज स्वतः वीणेला पत्र लिहूं शकतात अन स्वतः येऊन तिला घेऊन जाऊं शकतात!

खरेच काळानें किती गोष्टींना आपल्या पाठीशीं घातले आहे! परिस्थितीने आक्रमिलेली ही पाऊलवाट! आजच्या तरुण पिढीला रूढीचे

काटे बोचत नाहीत. परपरेचे खांचखळगे दिसत नाहीत कीं समाजाचे कांटेरी कुंपणही त्यांना अडवीत नाहीं रूढीच्या काट्यांनीं पाय रक्तबंबाळ झाले, परंपरेच्या खाचखळग्यानीं अनेक ठेचा लागल्या, अन समाज-शल्यांच्या तीक्ष्ण काड्याकुड्यांनीं कितीही घायाळ केले तरी त्या पाऊल-वाटेने येत असतांना आमच्या पिढीनें कधी हूं की चूं केले नाहीं—तोंड मिटून सारीं संकटे सहन केलीं. पण तीच पाऊलवाट आजच्या पिढीला एखाद्या राजमार्गासारखी रुंद, भव्य अन सरळ वाटतेय्! आशेचा झग-झगीत दीपक त्यांना पुढचा मार्ग दाखवीत आहेत. आईबापांचे नवीन जमान्याबरोबर बदलणाऱ्या मतांचे छत्र त्यांना परिस्थितीच्या दाहक उन्हांत देखील शीतल छाया देत आहे अन नवमतवादाच्या पुष्करिणी त्यांच्या हृद-यांत आनन्दाचे कारंजे उडवीत आहेत. सुधारणेचे छत्र शिरावर धरून नवमतवादाची पाऊलवाट चालणारी आजची पुरोगामी पिढी कुणीकडे अन सासूसासऱ्याच्या जाचानें अन पतीच्या धाकांत ती अनुनयाची मधुर लकेर कुठे अन् हे सामोपचाराचे रूक्ष बोल कुठे!

वत्सलाबाईंची ही विचार मालिका किती लांबली असतीं कुणास ठाऊक! पण तेवढ्यांत त्यांना वीणेने हाक मारली. त्या उठल्या, स्वयंपाक घरांत आल्या अन् चुलींत लाकूड लोटून त्यांनी चहाचे आधण ठेवले.

पुन्हां जिन्यावर पावले ऐकूं आलीं. सुनीति आली, विनायकरावही आले अन् थोड्याच वेळांत मधुकरही आला. रोजच्याप्रमाणे सगळ्यांचा हास्यविनोदांत चहा आटोपला, पण वत्सलाबाई मात्र गप्प गप्पच होत्या. चौधारी कारजांतून उडणारे पाणी एकाएकीं थांबले की जसे चटकन् लक्षांत येते तसेच रोज हंसतमुख असणाऱ्या गडबड्या अन् बडबड्या वत्सलाबाई आज म्लानवदन दिसतांच सगळ्यांना ते जाणवले, वीणा

म्हणाली देखील. " आई, आज सिनेमाला जाण्याचा विचार करीत होते मी! "चित्रा"ला " चन्द्रलेखा " लागलाय! फार वाहवा होतेय ह्या चित्र-पटाची! आपण सगळींच गेलों असतों पण तुझी तब्येत बरी दिसत नाहीं आज, डोकंबिकं दुखतंय का ग?"

टॉवेलने तोंड पुसतां पुसतां विनायकरावांनीं आपल्या पत्नीकडे पाहिले. विनायकरावांना आजपर्यंत बाहेरच्या आयुष्यांत कधींही कुठल्याही प्रकारचा त्रास झाला नव्हता. अन् संसारांत? वत्सलाबाईंच्या सान्निध्यांत संसार तर त्यांना एकाद्या रुचकर पक्वान्नासारखा वाटला होता. पण त्या स्वादिष्ट पक्वान्नांतही हास्याच्या आरोळ्या अन् विनोदाचे बदाम नसते तर त्या गोडींतही एक प्रकारची कटुता वाटली असती अन् ती विनायकरावांना आज जाणवलीही अगदीं.

वीणेकडे पहात ते म्हणाले, " हे बघ वीणा. आज तिला बरं वाटत नाहीं असं दिसतंय. तुम्ही असं करा. तूं, मधू अन् सुनीति—तुम्ही तिघं जा! आम्ही काय—पुन्हां जाऊं एकादे वेळेस "

अन् साताच्या "शो" ला वीणा, मधुकर अन् सुनीति ही तिघंही गेलीं.

तीं गेल्यानतर विनायकराव म्हणाले, " काय होतंय तुला? डोकं दुखतंय् कां?"

"कांहीं नाहीं....उगीच आपलं ..." वत्सलाबाईंनीं उडवाउडवी केली.

" उगीच कसं? नवीनच लग्न झालं असतं तर माहेरची आठवण येते कां म्हणून विचारलं असतं. मधू—वीणा दूर असते तर त्यांची आठवण येते कां म्हणून विचारलं असतं—पण तसंही नाहीं—मीही जवळ आहें तुझ्या—मग अशी........"

“ हें काय ? अशी थट्टा शोभत नाहीं आपल्या वयाला ! ” वत्सलाबाई किंचित् हसत म्हणाल्या. सुकलेल्या फुलावर पुन्हां टवटवी येऊंलागली.

आठ वाजतां सगळा स्वयंपाक आटोपला अन् वत्सलाबाईनीं पाटपाणी घेऊन विनायकरावांचे पान वाढले.

पाटावर बसतां बसतां विनायकराव म्हणाले, “ तूंही बैस ना माझ्या बरोबर ! मुलांना यायला उशीर होईल बराच ! ”

हे ऐकतांच वत्सलाबाई म्हणाल्या, “ वा ! असं काय ते ! आज आपण गमतीचंच बोलता आहात ! कधीं नाही ते असं बोलणं अन् तेही ह्या वयांत ... ! ”

वत्सलाबाईच्या विरोधांत उत्तेजनाचीच छटा होती.

“ हे वय—वय काय लावलंयस् तूं आज ? काय तरुण वयांतच पतीन पत्नीची थट्टा करावी ? काय तरूण वयांतच दोघांनीं बरोबर जेवावं ? आपल्यांत तारुण्याचा उच्छृंखलपणा नाहीं तरी एकमेकांविषयींची ओढ तर आहे ना ? ”

वत्सलाबाई भाजी काढतां काढतां हसल्या—खूप मोठ्याने अन् खूप मनमोकळेपणाने ! त्यांच्या हृदयांतला नाराजीचा माध्यान्ह टळला अन् आनंदाचा सायंकाळ तिथे अवतरला !

विनायकरावांचे जेवण झाले. वत्सलाबाईनीं आवराआवर केली अन् गॅलरींत येऊन चांदीच्या डबींतील सुपारी त्यांनीं पतीच्या हातावर ठेवली.

“ सुपारी तरी घे की माझ्या बरोबर, ” विनायकराव आत्मीयतेनें म्हणाले.

वत्सलाबाई आनन्दल्या—सुखावल्या. त्यांच्या हृदयांत चांदणं फुललं होतं अन् विनायकरावांशिवाय ते कुणाला दिसणारें होते थोडें ?

काल संध्याकाळीं वाचलेली ती राजवट अनुनयाची गोष्ट! ती त्या पार विसरल्या.

अनुनयांतली माधुरी गार गार अन् आंबट गोड सरबतासारखी असेल पण प्रौढ पणचे प्रेम अन् माया ही दुधासारखी गोड अन् परममंगल आहे असें त्यांना वाटलें. जुन्या काळच्या पतिपत्नीमधला प्रणय हा ढगाआड लपलेल्या चंद्रासारखा आहे—पानाआड दडलेल्या फुलासारखा आहे !

अन् म्हणूनच त्याची गोडी अवीट आहे !

विनायकरावांनीं सस्मित मुद्रेनें पत्नीकडे पाहिले.

...... .आकाशांत अष्टमीची चन्द्रकोर विलसत होती. चांदणें पृथ्वीला उजळून टाकीत होते. वाऱ्याच्या झुळकीसरशीं बागेतल्या जाईच्या फुलांचा वास येत होता अन् दूरवरच्या देवळांतली रात्रीची आरती मनाच्या प्रसन्नतेला पावित्र्याची जोड देत होता.

—"भगिनी," जुलै १९४९.



# २
# नि र्मा ल्य



"रझियाऽऽऽ! बेटी रझियाऽऽ!" पन्नाशी उलटलेल्या, पांढरं वस्त्र परिधान केलेल्या, केसांवर रुपेरी छटा आलेल्या अन् दृष्टींत क्षीणपणा आलेल्या त्या वृद्ध स्त्रीनं इकडेतिकडे शोधक दृष्टीनं पाहात आपल्या मुलीला हांक मारायला सुरवात केली. पुन्हा तिनं हांक मारली.

"बेटी रझियाऽऽऽ!"

अन् रझियेनं हांक ऐकतांच आपल्या कुत्र्याला हाताशीं धरून आईकडे धाव घेतली. तिची चाहूल लागतांच तीच्या आईनं वर मान करून पाहिलं.

ऐन तारुण्यांत पदार्पण करणारी रझिया तिच्या त्या कुरळ्या केसांना अन् खोडसाळ डोळ्यांना अतिशयच मोहक दिसत होती. तिनं बदामी रंगाची सुरवार अन् तसलाच शर्ट घातला होता अन् चॉकलेटी रंगाची तलम ओढणी तिच्या दोन्ही खांद्यांवरून पाठीमाग लोंबत होती.

"अम्माजान, कशाला ग बोलावलंस मला?" भुवया उंचावून तिनं विचारलं. त्यावेळेस तिच्या नेत्रांतले भाव अन् ओठांची हालचाल इतकी सुंदर झाली कीं तिची आई मनांत एकदम खूष झाली अन् म्हणाली, "बेटी, चल. पुरे कर तुझं खेळग! कपडे बदल त्या पलीकडच्या अलमारींतली जॉर्जेटची नवीन साडी नेस. हें बघ! आज आपल्याकडे फार बडे मेहेमान येणार आहेत."

" बडे मेहेमान ? बडे मेहेमान कोण अम्माजान ?"

" बेटी, कशी ग तूं ? अग, दल्दल्पूरच्या नबाबसाहेबांचे खाजगी तैनातींतले एक मोठे कारभारी तुझं गाणं ऐकायला येणार आहेत. चल आटप आणि हे बघ! कारभारी आल्यानंतर अशी चीज त्यांना म्हणून दाखव कीं ते एकदम ."

" अम्माजान, पण कां ग? त्यांना काय म्हणून माझं गाणं ऐकायचं आहे? तूं मला गाणं शिकवलंस ते काय अशा श्रीमंतांचीं मनं रिझवायला का? त्यांचान् माझा संबध तरी काय?"

" नाहीं नाही, असा रागावू नकोस एकदम! ऐकून तर घे! तुझं गाणं आज जरी हे कारभारी ऐकणार असले तरी त्याची कीर्ति नबाब-साहेबापर्यंत जाणार आहे, हे तुला कसं समजत नाही? पगली कुठली!"

" हूंऽऽ! पगली!" असं म्हणत रझिया ड्रेसिंग टेबलासमोरच्या ठेंगण्या स्टुलावर बसली. तिनं आरशांत पाहिलं. आईच्या त्या विचित्र सांगण्यानं तिच्या कपाळावर आंठ्या उमटल्या होत्या अन् नेत्रात नाराजीचं पाणी खेळत होतं.

तिनं मागं वळून पाहिलं एका कोचावर तिची आई कोपऱ्यांत बसली होती अन् आपल्या मुलीला आतां समजवाव तरी कसं हा पेचप्रसंग तिला पडला होता. तिच्या नेत्रांत व्याकुळता होती—विनवणी होती!

आईकडे पाहात असतांनाच तिला आठवलं. दोन वर्षापूर्वीं तिचे अब्बाजान वारले. त्या वेळेस मरतां मरतां तिला जवळ घेऊन ते म्हणाले, " बेटा, चाललों मी! तुझ्या आईच्या आज्ञेबाहेर जाऊं नकोस. ती तुझं सगळं चांगलं करील. अल्ला तुझं भलं करील! होय्ऽऽ! या अल्ला! या परवरदिगार!" असं म्हणून त्यानी प्राण सोडला.

अन् हें आठवतांच तिच्या कपाळावरच्या आठ्या विरल्या अन् नेत्रां-तला क्रोधाग्नि विझून गेला.

शांतपणानं ती म्हणाली, " अम्माजान, ही बघ, आतां मी तयार होतें— पण कुठली चीज म्हणूं मी ?"

आपल्या लेकीच्या विचारांत झालेला हा फरक पाहून तिच्या आईला मोठं आश्चर्य वाटलं अन् ती कारभाऱ्यांची वाट पाहूं लागली.

रझियेनं ज्या वेळेस दिवाणखान्यांत प्रवेश केला त्या वेळेस एक खूप लठ्ठ गृहस्थ कोचावर रेलून बसलेले तिला दिसले. त्याच्या त्या अवाढव्य शरिराकडे अन् शोधक डोळ्यांकडे पाहून आधीच नाराज असलेली रझिया जास्तच नाराज झाली.

तिला पाहून तिची आई त्या गृहस्थाना म्हणाली, " ये है मेरी रझिया !"

" रझिया ? ओऽऽहो ! किती सुंदर नांव ! रझिया ! रझियाबेगम, आम्हांला एखादी चीज ऐकवणार काय ?"

तिनं त्यांच्याकडे फिरून एकदां पाहिलं अन् दिलरुबा हातांत घेतला. क्षणार्धांत त्या दिवाणखान्यांत सुरेल संगीताचे सूर निनादून गेले अन् रझियेच्या आवाजीची जोड त्यांना मिळतांच कारभारी तर बेहद्द खूष होऊन गेले.

दलदलपूरच्या नबाबसाहेबाच्या अंतःपुरांत ह्या कारभाऱ्यांनीं आतां-पर्यंत पाचपन्नास स्त्रिया आणवल्या होत्या. पण त्या सर्वांत रझिया हीच अतिशय सुस्वरूप व कोकिलकंठी ठरणार होती. नबाबसाहेब ह्या गोष्टी-मुळं खूष होणार होते अन् कारभाऱ्याच्या तिजोरींत एखाद्या मूल्यवान अलंकाराची अगर मोठ्या अन जड अशा रेशमी थैलीची भर पडणार होती.

रझियेच्या सौंदर्यानं कारभारी खूष झाले खरे, पण ह्या पुढच्या कल्पनेनं मात्र त्याना अतिशय आनंद झाला !

दिवाणखान्यांतलं स्वरांचं अन् सुरांचं समेलन थांबलं; कारभारी म्हणाले, "वाहवा ! वाहवा ! बहोत अच्छा ! बहोत अच्छा. रझियाबेगम, आमचे नबाबसाहेब खूष होतील तुमच्यावर ! फार खूष ! एकदम खूष !" अन् ते एकदम सातमजली हंसले.

"म्हणजे ?" रझियेचे डोळे विस्फारले गेले; भुवया उंचावल्या गेल्या.

तिच्याकडे पाहात तिची आई म्हणाली. "अग, नबाबसाहेबांना तुझं गाणं एकदा ऐकवावं अशी माझी फार इच्छा आहे. ती आता पूर्ण होईल." कारभाऱ्यांकडे वळून ती पुढे म्हणाली "काय सांगू आपल्याला ? पूर्वायुष्य फार सुखांत—ऐश्वर्यात गेलं. रझियेनं आतापर्यंत दुःख असं कुठलं पाहिलं नव्हतं. पण . .खाविंद आम्हाला टाकून गेले. अन् म्हणून वाटतं की माझ्या रझियेचं आतां होणार तरी कसं ? तुमचे नबाबसाहेब फार दयाळु आहेत, उदार आहेत अन् मोठे हौशी आहेत म्हणून म्हणते—"

"बस्स् ! बस्स् ! नबाबसाहेबाजवळ रझियेसाठीं कसल्याच प्रस्तावनेची जरुरी नाहीं. नबाबसाहेबांच्या दृष्टीला ती नुसती पडली की काम झालंच म्हणून समजा ! बरं तर ! पुढच्या बुधवारीं ! पुढच्या बुधवारीं ह्याच वेळेस गाडी येईल अन् रझियेला घेऊन जाईल. समजलं ! बरं येतों मी !"

कारभारी गेल्यावर रझियेनं एकदम कोंचवर अंग टाकलं अन् सावरीच्या उशींत तोंड खुपसून तिनं हुंदका दिला.

तिच्या पाठीवरून हात फिरवीत तिची आई म्हणाली, "बेटी, वेडी तर नाहीस तूं ? नबाबसाहेबांच्या राजवाड्यांत प्रवेश मिळावा

म्हणून तुझ्यासारख्या कितीतरी स्त्रिया वाट पाहात आहेत—वा पाहून कंटाळून जात आहेत. तुला मिळणारी ही सुवर्णसंधि...."

" काय सुवर्णसंधि ? म्हणजे म्हणतेस तरी काय तूं ? "

" राजाच्या राजवाड्यांत प्रवेश करणं म्हणजे सुवर्णसंधि नाहींतर काय ? तिथं दुःखाला वाव नाही न् सुखाला मर्यादा नाहीं तुला अजून कशाची कल्पना नाहीं म्हणून तूं असं म्हणत आहेस. असा त्रागा करायला काय झालं ? हास, नाच, गा अन् खुपी मान ! "

" हाय ! अब्बाजान, कुठं आहांत तुम्ही ? " असं म्हणून रझियेनं विकलतेनं हुंदका दिला अन् ती तशीच कॉटवर पडून राहिली.

बुधवारीं संध्याकाळीं संस्थानची कोरीकरकरीत गाडी रझियेच्या बंगल्या-जवळ थांबली अन् गाडीचा पोंगा दोनदां वाजला.

पांच दिवस सतत विचार करून रझियेची विचारशक्ती जणू नष्ट झाल्यासारखी झाली होती. तिला राहून राहून कारभाऱ्याच्या त्या सात-मजली हास्याची आठवण होत होती. त्या हास्यातला हेतु दुष्ट होता—त्यांत शुचिता नव्हती, त्यामुळंच तिला भीतीन घेरून टाकलं होतं. पण शेवटीं तिनं निर्णय घेतला. ' काय होणार आहे नबाबसाहेबांना एकदां गाणं ऐकवलं तर ? एकदां राजवाड्यांत जाऊन त्यांना गाणं ऐकवून यायचं बस्स् ! '

अन् म्हणूनच मोटारीचा पोंगा दोनदां वाजल्यावर व चपराशानं वर्दी दिल्यावर ती आईच्या आग्रहाशिवाय मोटारींत जाऊन बसली.

नबाबसाहेबांच्या राजवाड्याच्या पहिल्या दालनांत प्रवेश करतांक्षणींच रझियेचे डोळे दिपून गेले. रझिया श्रीमंतींत वाढली होती हें खरं ! पण असं वैभव तिनं आजपर्यंत पाहिलं नव्हतं. रंगीबेरंगी मऊ मऊ

गालीचे, उंची फर्निचर, कोपऱ्यांत ठिकठिकाणीं ठेवलेल्या त्या शोभेच्या वस्तु, निरनिराळ्या आकाराचे विजेचे दिवे... रझियेचे डोळे ह्या साऱ्या वैभवानं दिपून गेले.

आणखी चार दालनं ओलांडून ती कारभाऱ्यांसमवेत नबाबसाहेबांच्या खास महालाकडे आली. तिथला थाट व एकंदर नूर बाकीच्या भागा-पेक्षां अगदीच वेगळा होता. ती घाबरली—बावरली अन् तिची दृष्टि समोर गेली.

समोरच्या मंचकावर बसलेला, तिशीच्या सुमाराचा, रुबाबदार चेहऱ्याचा शानदार पोषाकाचा अन् हंसऱ्या डोळ्याचा ती राजबिंडा तरुण दृष्टीस पडताच रझिया एकदम घाबरून गेली. ह्याच्यापुढे आपला आवाज लागावा तरी कसा, आपण गाणं म्हणावं तरी कसं हा विचार मनांत येतांच तिच्या अंगाला दरदरून घाम सुटला, हातपाय थरथर कापूं लागले. ओठ शुष्क झाले अन् हृदयाचं स्पदन जोरजोरांत होऊं लागलं.

तिनं नबाबसाहेबाना कसाबसा ‘ कुर्निसात् ’ केला अन् जास्त वेळ उभं न राहवल्यामुळंच की काय, ती त्याच्या परवानगीशिवाय एकदम गालिचावर बसली.

तिला आपादमस्तक न्याहाळीत ते म्हणाले, “ आपकी तारीफ ? ”

शुष्क ओठांवरून जीभ फिरवून गुदमरलेल्या आवाजांत उत्तर आलं, “ रझिया !”

“ ओ:ऽऽ! बहोत अच्छा ! बहोत मीठा नाम ! अच्छा रझिया-बेगम, अब कौनसी चीज सुनाओगी ? ” नबाबसाहेबांनी लगेच सगळी वादनसामुग्री बोलावली व ते मंचकावर रेलून बसले.

वाद्याचे सूर अन् रझियेचा स्वर एकत्रित होतांच तिचा घाबरटपणा पळून गेला अन् निःशंकपणानं तिनं गीत आळवायला सुरवात केली.

तिच्या डोळ्यांतले भाव, स्वरांतली आर्तता, अवयवांचा रेखीवपणा अन् यौवनाची बहारी—नबाबसाहेब अगदी वेडे झाले एकदम !

अन्.. .अन् तिला वाटलं होतं की गाणं ऐकवल्यानंतर आपल्याला घरीं जायला मिळेल ! पण तसं झालं नाही. तिचा पाय एकदां राजवाड्यांत पडल्यावर तो पुन्हां राजवाड्याच्या बाहेर पडूं नये अशी कडक व्यवस्था करण्यांत आली. .. .. ..

नबाबसाहेबांची ही सारिका त्याच्या पिंजऱ्यांत अडकून एक महिन्याचा काळ लोटला होता. गाणं ऐकवल्यानंतर घरी जाण्याचे विचार तिनं केले होते. घरीं गेल्यावर आईला खूष केल्याचं समाधान तिच्या नेत्रांना अनुभवायचं होतं. आपल्या लाडक्या टॉमी कुत्र्याशी तिला खूप खेळायचं—बागडायचं होतं. एवढंच काय, पण नबाबसाहेबांच्या वैभवाच्या साऱ्या गोष्टी तिला तिच्या प्रिय मैत्रिणीला सांगायच्या होत्या.

पण.. .सारिका पिंजऱ्यांत अडकली गेली. नबाबसाहेबांचं मन रिझविण्यासाठी अडकली गेली. दरबारचं काम आटोपल्यावर नबाबसाहेबांच्या शिणलेल्या जिवाला दिलासा देण्यासाठी अडकली गेली.

त्या रात्रीं त्या दिवाणखान्याच्या कोपऱ्यात बसून तिनं आकांत केला होता. आईला शिव्या दिल्या होत्या—अल्लाला बोल लावले होते अन् नबाबसाहेबांच्या पायाशीं लोळण घेऊन आपल्याला ' मुक्त ' करण्याची याचना त्यांच्यापाशीं केली होती.

ह्या गोष्टीला आतां महिना झाला होता अन् रझिया तिच्या ह्या नवीन आयुष्यक्रमांत थोडीफार रुळून चालली होती—

त्या दिवशीं संध्याकाळीं तिची आई तिला प्रथमच भेटायला आली होती. खरं म्हणजे आईची आपल्या लेकीला भेटण्याची फार इच्छा होती व त्याप्रमाणं रझिया राजवाड्यांत आल्याच्या दुसरे दिवशीं तशी वर्दी देऊन तिला भेटण्याचा प्रयत्नहि तिनं केला होता. पण रझिया उगीचच जास्त आकांत करील ह्यासाठी तिला परवानगी नाकारण्यांत आली होती.

अन् म्हणूनच आतां परवानगी मिळताच ती संध्याकाळच्या सुमारास रझियेस भेटण्यासाठी आली. लहानपणापासून तिला रझियेचा वियोग असा कधी घडला नव्हता. आणि आतां एक महिना ती तिच्यापासून दूर राहिली होती. तिला भेटण्यासाठी तिचे नेत्र आसावले होते अन् हृदय व्याकुळ झालं होतं.

रझियेला मात्र ह्या गोष्टीची काहीच कल्पना नव्हती. सायंकाळच्या ह्या रम्य वेळीं ती राजवाड्याच्या पलीकडच्या उद्यानांत एका हौदापाशीं पाण्यांतल्या तांबड्या रंगाच्या माशांची मनोहर हालचाल पहात हौदाच्या कडेवर बसली होती. कारंजांतून पाणी उडत होतं. अन् त्याचे तुषार हवेंत इतक्या जोरानं उडत होते की सायंकालच्या त्या रम्य सूर्यप्रकाशांत त्या तुषारांची एखादी सप्तरंगी शलाकाच भासत होती. रझिया क्षणांत कारंजाकडे पाहात होती. तर क्षणांत पाण्यांतल्या माशांच्या खेळाशीं तद्रूप होत होती.

तिचा चेहरा असा सारखा हालल्यामुळं तिच्या कानांतील हिऱ्याच्या भूषणांचे किरण क्षणांत तिच्या गालांवर स्थिर होत होते तर क्षणांत ते पाण्याच्या पृष्ठभागावर धांव घेत होते. तिच्या तलम बनारसी साडीचा पदर वाऱ्यानं फडफडत होता. गुलाबी सॅटीनच्या ब्लाऊझची बाही दंडांत रुतून बसल्यासारखी दिसत होती अन् वाऱ्यावर भुरभुर उडणाऱ्या

केसांना सांवरतांना तिची रंगवलेलीं नखं डाळींबाच्या लालचुटूक दाण्यां-सारखी दिसत होती.

रझियेला अशी पाठमोरी बसलेली तिच्या आईनं पाहिली. पण एक महिन्यानं भेटणाऱ्या लेकीला असं दुरून पाहून तिचं समाधान होणार नव्हतं. चपराशी निघून गेल्यावर ती रझियेच्या अगदी जवळ आली अन् आपल्या लाडक्या लेकीला हृदयाशीं धरून कुरवाळण्याची इच्छा तिच्या मनांत इतकी प्रबळ झाली की अनावर आतुरतेनं तिनं आपला हात तिच्या मस्तकावरून फिरवीत हांक मारली, " बेटी ! मेरी मुन्नी !"

मस्तकाला स्पर्श होतांच रझियेनं मान वळवून पाहिलं—तिची अम्मा-जान ! तिला ह्या सोन्याच्या पिंजऱ्यांत अडकवून टाकणारी तिची आई ! संतापानं ती लाल झाली अन् म्हणाली, " कोण ? अम्माजान तूं ? वा ! फार लवकर आठवण झाली तुला ! मला ह्या कोंडवाड्यांत आणून तुला काय मिळालं ? जा ! जा ! नको, माझ्यासमोरहि येऊं नकोस तूं ! माझं सारं आयुष्य बरबाद करणारी स्त्री—ती माझी आई होवूं शकत नाही. जा ! जा तूं !" असं म्हणून तिनं दोन्ही हातांनीं तोंड झांकून हुंदके द्यायला सुरवात केली.

तिला जवळ घेत तिची आई म्हणाली, " बेटी, असं काय करतेस ? माझं ऐक तर खरं.... "

" नाहीं, नाहीं, तुझा एकहि शब्द ऐकायचा नाहीं मला........जा. जा. तूं ! "

अन् तेवढ्यांत चपराशानं वर्दी दिली की जहांपनाह उद्यानांत सहल करण्यासाठीं येत आहेत.

रझियेच्या आईनं पाय उचलता घेतला व ती चटकन् निघून गेली.

नबाबसाहेब रझियेच्या जवळ येतांच म्हणाले, “ प्यारी. हे काय ? तुझ्या अम्माजानला तूं कां भेटली नाहीस ! आणि तुझ्या नयनांत अश्रू कशासाठीं ?”

ती कांहींच बोलली नाही.

“ तुला इथं रहायला आवडत नाहीं का ? तुला सुख लागत नाहीं कां ? ” नबाबसाहेबांचा आवाज तीव्र झाला होता.

“ छे छे:, जहांपनाह. माफ करा, आपण आनंदासाठी सहलीला यावं अन् मीं असं अ ढाळीत बसावं .खरंच. सरकार, माफ करा मला ! ”

सतारींतून निघणाऱ्या मंजुळ सुरासारखे तिचे गोड बोल ऐकून नबाब-साहेब खूष झाले !

आणि असल्या खुषींतच त्यांनी पुढचे चार महिने रझियेच्या स्वर्गीय सहवासांत आनंदांत काढले.

पण ..! एक दिवस मोठा अपशकुनी उगवला. त्या दिवशीं सकाळीं उठल्यापासून रझियेचं डोकं दुखत होतं अन् साधारण तिसरे प्रहरीं तिला ताप भरला. जनानखान्यांतील कोणत्याहि स्त्रीची जितकी काळजी घेतली जाणार नाही इतकी रझियेची काळजी घेण्यांत आली. पण त्या दिवशीं तिचा ताप उतरला नाहीं. दरबारचे सर्जन तीनदा येऊन तिची प्रकृति पाहून गेले अन् दुसरे दिवशीं ताप टायफॉईडचा आहे असं निदान करण्यांत आलं.... ..

चाळीस दिवसांच्या तापांतून उठल्यानंतर रझियेला जर कुणीं पाहिलं असतं तर पूर्वीची रझिया अन् आतांची रझिया यांत जमीन अस्मानाचं दिसून आलं अंतर असतं. तिच्या डोळ्यांतला हंसरेपणा लुप्त झाला होता.

कांति फिक्कट झाली होती. अवयवांचा गोंडसपणा नाहींसा झाला होता. अन् वृत्तींतला खेळकरपणा पळून गेला होता. तिचे केस गळूं लागले होते, त्यामुळे जास्तच रुंद वाटणारा तिचा भालप्रदेश मोठा विचित्र दिसत होता.

यौवनाची बहारी नाहींशी झाली होती अन् अशा वेळेस नबाब-साहेबांमधला भ्रमर जागृत झाला—सुकलेल्या फुलाची मातब्बरी ती काय असणार ?

अन् ही गोष्ट रझियेच्या लक्षात येतांच ती चरकली. आपल्या अदृष्टाच्या पानांवर लिहिलंय् तरी काय, ही शंका तिला अहोरात्र भेडसावूं लागली. नबाबसाहेबाचे कारभारी ह्याच वेळेस एका नव्या ‘ शिकारी ’च्या तयारींत असलेले तिला दिसले अन् ह्याच सुमारास तिची आई आकस्मात मरण पावल्याची वार्ता तिला समजली. तिला वाटलं आपलं आयुष्य आता वाऱ्यावर वाहणाऱ्या लाटेसारखं आहे. परिस्थितीच्या भयंकर खडकावर ती लाट केव्हातरी आदळणारच आणि मग ?—

अशांतच एके दिवशीं सकाळीं नबाबसाहेबाचे एक जहागीरदार त्यांना भेटण्यासाठीं आले होते. भेट झाली, नजराणा दिला गेला सरबराई झाली अन् जहागीरदारसाहेब नबाबसाहेबांजवळ जाण्याची परवानगी मागूं लागतांच नबाबसाहेब म्हणाले, “ हें पहा मी आपल्यावर फार खूष आहें. अन् माझी केवळ खुषी म्हणूनच मीं आपल्याला एक बक्षीस देण्याचा विचार केला आहे. काय ? ”

“ जहांपनाह, मी आपला बंदा गुलाम ! आपण जें द्याल त्याचं मी माझ्या जीवापलीकडे जतन करीन ! ”

ह्या उद्गारानीं नबाबसाहेबाच्या चेहऱ्यावर हास्यरेखा उमटली. त्यांनी नोकराच्या कानांत कांहीतरी सांगितलं अन् पांच मिनिटांनी परत आला.

ती एकटाच नाहीं तर नबाबसाहेबाची एके काळची प्रेयसी रझिया हिला घेऊनच !

" हे पहा ! तुमच्यासाठीं खास बक्षीस ! "

तिच्याकडे पाहून नबाबसाहेबांनी उद्गारलेल्या ह्या शब्दांनी तिच्या कानांला तापलेल्या तेलासारखा चटका दिला. आपल्या पायांखालची जमीन गरगर फिरते आहे कीं काय असं तिला वाटलं.

तिच्या जन्मदात्या आईनं तिला कांहीएक न विचारता तिला नबाबसाहेबांना अर्पण केलं होतं अन् आताही तिला कांहीएक न विचारतां—तिची कुठल्याहीप्रकारें संमति न घेता तिला जहागीरदारसाहेबांना नजर करण्यांत येत होतं. तिला आपली ही विटंबना सहन करवेना !

' बक्षीस ' म्हणून स्वीकारणाऱ्या आपल्या त्या नवीन आश्रयदात्याकडे तिनं पाहिलं.

माठी उलटलेल्या, तोंडाच बोळकं झालेल्या, डोक्याचं टक्कल झालेल्या अन् सर्वांगावर सुरकुत्या पडलेल्या त्या जहागीरदारसाहेबांकडे रझियेनं हळूच पण भीत भीत पाहिलं. अन् त्याच वेळेस जहागीरदारसाहेबांनी वर मान करून मिचमिच्या डोळ्यांनी तिला न्याहाळलं . . .

त्या दिवशीं तिनं पुन्हा आकांत केला, आईला शिव्या दिल्या, अल्लाला बोल लावले व नबाबसाहेबांच्या चरणाशीं लोळण घेतली; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.......

रझिया आपल्या नवीन घरीं आली. त्या वेळेस ती बावरली नाही—घाबरली नाहीं. उलट जहागिरदारांच्या देवडींत तिनं शांतपणानं पाऊल ठेवलं. नबाबसाहेबांच्या राजमहालांत प्रथम तिची जशी तैनात ठेवण्यांत आली होती तसल्याच वृत्तीनं पण कमी वैभवांत तिला इथं वाग-

वण्यांत येत होतं. दोघांचा हेतु एकच होता—मजा—उपभोग—सौंदर्याची लयलूट!

एकदा जहागिरदारसाहेब रझियेला म्हणाले, "बेगमसाहीबा तुझं वय असं ज्वानीचं असतांना तूं अशी खिन्न, उदास का असतेस? तुझ्या दुःखाचं कारण तरी काय? नबाबसाहेबांच्या राजवाड्यांत राहिल्यामुळं तुला ह्या माझ्या देवडीत सुख लागत नाही काय? बोल, सांग? सांग तुझ्या दुःखाचं कारण!"

"माझ्या दुःखाचं कारण?" रझियेनं तिरसटपणानं विचारलं. तिला वाटलं आपल्या अंतरंगांत अहोरात्र होणारा कोलाहल जहागिरदारसाहेबां-पुढं मनमोकळेपणानं व्यक्त करून आपलं हृदय तरी हलकं करावं! पण दुसऱ्यांच क्षणीं तिला वाटलं की त्याचा काही उपयोग होणार नाहीं. म्हणून ती गप्पच राहिली.

"बोल, बोल, संकोच का करतेस? नबाबसाहेबांनी हे रत्न जें मला दिलंय् त्याची बडदास्त तर मी नीट ठेवीतोय् ना? फुलाचा धर्म हंसण्याचा! नाचण्यांचा! डोलण्याचा! साऱ्या दिशा आनंदित कर-ण्याचा होय कीं नाही?" असं म्हणून आपल्या रुपेरी मिशाना विशीच्या तरुणासारखा पीळ देत ते हंसले.

पण शांतपणानं रझिया म्हणाली, "सरकार, फुलाचा धर्म हंसण्याचा, डोलण्याचा, खरं आहे हें! अन् फूल आपल्या मर्जीनुसार डोलतंय्, लहरीनुसार हसतंय्, हेहि खरं नाहीं कां?

उपहासानं उद्गारलेल्या ह्या शब्दांनीं जहागीरदारसाहेब उलट खूषच झाले अन् आपल्या आयुष्यांत भोगलेल्या साऱ्या ऐश्वर्याची—वैभवाची—गोड आठवण करीत मंचकावर पहुडले........

रझियेच्या ह्या देवडींतल्या वास्तव्याला दोन महिने झाले होते. पण नबाबसाहेबांच्या महालांत ती जशी थोडीबहुत कां होईना पण रुळली होती तशी ती इथं रुळूं शकली नाहीं. आतांपर्यंत तिला आलेले अनुभव इतके कटु होते कीं आयुष्यावरचा, सुखावरचा किंबहुना साऱ्या जगावरचा तिचा विश्वास पार उडून गेला होता.

नबाबसाहेबांसारखेच जहागिरदारसाहेबांनी तिला जर वाऱ्यावर सोडून दिलं तर तिचं कसं व्हावं हा विचार तिच्या मनांत दिवसांतून शेकडों वेळां येत होता अन् दैव तरी पहा कसं

जहागिरीच्या गावाला कांही कामानिमित्त गेलेले जहागीरदारसाहेब परत देवडींत आल्यावर हृदयविकारानं आजारी पडले. दूरदूरच्या व निष्णात डॉक्टरांना आणण्यात आलं. पण दुर्मिळ औषधीयोजनांनीसुद्धां रोग बरा होण्याची चिन्हं दिसेनात. छातींत कळ आली कीं जहागिरदारसाहेब मोठमोठ्यानं कळवळून ओरडत अन् अशा वेळीं त्यांच्या लग्नाच्या बायकांपेक्षा त्यांच्या अंतःपुरांतील स्त्रियांचं धावं दणाणून जाई !

जहागीरदारसाहेब ह्या रोगाशीं पुष्कळ दिवस झगडत होते, पण एके दिवशीं पहाटेच्या वेळीं त्यांचा आत्मा नश्वर देह सोडून निघून गेला.

पंधरा दिवसांनंतर जहागीरदारसाहेबांच्या लग्नाच्या दोन बायकांनी जनानखान्यांतील साऱ्या बेगमांना हांकलून लावण्याची मोहीम सुरू केली. रझियेजवळ येऊन त्यांपैकी एक म्हणाली, “ रझिया, हें पहा, खाविंद गेले. आता जनानखान्यांतील स्त्रियांचा हा अचाट खर्च चालविण्याची आमची इच्छा नाहीं..... ...” एवढं बोलून ती थोडीशी घुटमळली व पुढं म्हणाली, “ तूं आपली व्यवस्था लवकर करावीस हें बरं ! समजलं ? ”

" पण मी कुठं जाऊं ? " काकुळतीनं रझियेनं विचारलं. तिचे डोळे आंसवांनी भरून आले अन् गालांवरून तीं ओघळून आली.

" कुठं म्हणजे ? जिथून आलीस तिथं जा ! "

"तिथं मला थारा नव्हता! म्हणून तर इथ पाठवण्यात आलं होत !"

" मग तुझ्या घरीं जा ! समजलं ? " जहागीरदारीणबाईचा आवाज चढत होता.

" घरीं ! कुठलं घर ? कुणाच घर ...? घरसुद्धा नाही मला .. कुठं जाऊं मी ? अल्ला ! या अल्ला ! त्यापेक्षा मला मरण तरी कां देत नाहींस रे ? " असें म्हणून ती हुंदके देऊन रडूं लागली.

" हं ! अशीं सोंगंढोंगं करूं नकोस. तुझ्या अश्रूंनीं अन् हुंदक्यांनीं मी फसणार नाहीं. घर नाहीं तर वाट फुटेल तिकडे जा. "

असं फणकाऱ्यानं म्हणत जहागीरदारीणबाई निघून गेल्या .. ..

दलदलपुरच्या ह्या राजधानीच्या शहरी बाजारपेठेच्या उजव्या बाजूला एक दोन मजली इमारत आहे. वरच्या खिडक्याना जाळीचे पडदे लावले आहेत. दिवसभर तिथं ग्रामोफोनवर कव्वाली वाजत आहेत, सिगरेटचा धूर निघत आहे, अत्तराचा घमघमाट आहे, पैंजणांचा छुमछुमाट आहे न् रुपयांचा खणखणाट आहे.

जाळीचा पडदा दूर सारून रझिया खिडकीतून रस्त्याकडे पहात आहे अन् आता निर्माल्य झालेल्या पण एकेकाळीं नबाबसाहेबांचा राजमहाल भूषविलेल्या ह्या फुलाच्या क्षणिक सहवासासाठीं गुलजार भ्रमर जिन्याच्या पायऱ्या चढत आहेत.... !

—" स्त्री " नोव्हेंबर १९४९

# ३

# ठोकर



मध्याकाळीं पाच वाजता गिरणीचा तो कर्णकर्कश भोंगा होतांच या गिरणीकामगाराचं चेहेरे आनन्दाने फुलून गेले. सकाळपासून गाड्याला जुंपलेल्या बैलासारखं त्यानी रक्त आटवून अन् घाम निपटून काम केलं होत . संध्याकाळीं बरोबर पांच वाजतां ह्या कर्णकर्कश भोंगा ऐकताच शाळेतून घरीं जाणारीं लहान लहान मुले कानात बोटं घालीत होती अन् रंगविलेल्या नखानीं विभूषित केलेलीं आपली सुकुमार बोटं नाजूकपणानें कानावर ठेवीत "सऽह्याऽय" असा उद्गार काढीत होती ......पण सकाळपासून यंत्राच्या सान्निध्यात यंत्रासारखं काम करणाऱ्या कामगाराचे कान मात्र ह्या कर्णभेदक किंकाळीसाठीं आतुरले होते. यंत्रांतून निघणारा तो भयंकर चित्कार त्यांची मुक्तता सुचवित होता—त्या दिवशीच्या कामानंतर तिसरे दिवशीच्या सकाळपर्यंतची मुक्तता सुचवित होता—पत्नीच्या अन् मुलाबाळांच्या सान्निध्यांतले सुखाचें क्षण सुचवित होता अन् गरिबीनं गांजलेल्या अन् दुःखाचं दैन्य सहन करूं न शकणाऱ्या दुर्बल दासांना दारुच्या गुत्याचा अपर सृष्टीचा मार्ग दाखवीत होता !

भोंग्याचा आवाज अजून थांबला नव्हता. पण त्या कर्णकटु आवाजातसुद्धां हजारो मजुरांच्या खिशातील पैशाचा खुळखुळाट कांहीं लपूं शकत नव्हता. गिरणींतल्या हजारो चेहऱ्यांवर हास्य विलसत होतं, निस्तेज

चेहेरे उजळून गेले होते अन् आठ तास काम केल्यानंतरही त्यांच्या गात्रांत एक नावीन्यपूर्ण अन् वैचित्र्यपूर्ण शक्ती ओसंडत होती!!

ह्या असीम आनन्दानं भारावूनच कीं काय, श्रीपतनं तोंडानं शीळ घालतां घालतां अंगांत कोट घातला. पुष्कळ वर्षं वापरून ठिकठिकाणी फाटून गेलेलं पैशाचं पाकीट पुनः पुन. चाचपून पाहिलं अन् टोपीवरचा धुरळा झटकीत तो घरी निघाला.

जातां जाता त्याने कोपऱ्यावरच्या हलवायाकडून मिठाई घेतली अन् ती मिठाईची पुडी झेलीत झेलीत तो आपल्या खोपटवजा खोलीकडे आला. खोलीपुढच्या टीचभर उघड्या जागेत त्याचा सहा वर्षांचा गंगाधर सिगा-रेटच्या रिकाम्या पाकिटाशी खेळत होता अन् चार वर्षांची लहानगी मंजू पाकिटातली रुपेरी वर्खं जमवीत होती. त्याना पहातांच श्रीपतची पावलं अधीरतेनं पडूं लागलीं. जवळ जवळ धांवतच तो त्यांच्याजवळ आला अन् मंजूला उचलून घेत, गंगाचा हात धरला व तो घरांत आला. त्याची कारभारीण चुलीजवळ बसून भाकरी भाजीत होती अन् लसणाच्या चट-णीचा खमंग वास त्या चिमुकल्या घरकुलांत दरवळत होता.

अत्यानंदानं त्यानं हांक मारली, "गिरजाऽ!"

गिरजेनं डोक्यावरनं निसटलेला पदर पिठानं भरलेल्या हातांनीच नीट सांवरला अन् तव्यावर थपकन् भाकरी टाकली. नवऱ्याकडे पहात ती म्हणाली, "काय आज लई खुशीत दिसतायसा?"

"कारभारणी, खुशीत असूं नको तर काय? आज तूं मागशील ते देईन मी! गंगा—मंजूला नवीन कपडे, तुला नवीन टोकपदरी लुगडं, खूप खूप मिठाई, मजा—जिवाची मुंबई करायची आज!"

"हां हां! काय बोलून हात्रया जीवाची ममई करायला, किती पैका लागल ह्याचा काय इच्यार?"

'किती लागेल?— बघ तर खरं!' असं म्हणून त्यानं आपलं फाटकं पाकीट उघडलं अन् त्यांतून दहाच्या नोटा काढून तिच्यासमोर पसरल्या.

त्या नोटा पाहून गिरजेचे डोळे विस्मयानं विस्फारले गेले अन् तोंड आश्चर्यानं उघडंच राहिलं. इतक्या नोटा, इतके पैसे तिनं अजून कधीही पाहिले नव्हते.

चुलीवरच्या भाकरींतून करपल्यामुळे धूर निघत होता पण तिचं त्याकडे लक्षच नव्हतं!

"कारभारी, हे काय? कुठून आणलाया एवढा पैका? कुनाचं ह्ये हे सारं धन?"

"कुणाचं? आपलं! आपलं आहे. गिरजा, अशी बावरून काय जातेस? अरे, पण हें काय? मिठाईची पुडी राहिली कीं! चला—गंगा, मंजू, या माझ्याजवळ!"

श्रीपतनं चौघांच्या पुढ्यांत कागदावर मिठाई ठेवली. गंगा अन् मंजूला अपरिमित आनंद झाला. पण कितीही पटवून दिलं तरी गिरजेला पैशाच्या प्राप्तीची गोष्ट खरीच वाटेना. ती पुनः पुनः विचारीत होती, "गल्ल्याच्यान्, कुठून आणले हे पैसे?"

"गिरजा, खरं सांगतों ना? आमच्या गिरणीचा मालक आहे ना? त्याला खूप फायदा झालाय ह्या वर्षी. खूप पैसा मिळालाय् त्याला. म्हणून त्यानं त्याच्या नफ्यांतला थोडे थोडे पैसे प्रत्येक कामगाराला वाटलेत, तेच

हे सारे पैसे! माझं म्हणणं तुला खरे कां वाटत नाहीं माझ्यावर तुझा भरंवसा नाहीं कां?"

"भरंवशाची काय गोष्ट कारभारी? पन्--पन् मला ह्या ममईचं लई भय वाटतं पघा!"

"ममईचं भय? वेडी तर नाहींस? मुंगीसारखी माणसं मरलीत इथं अन् तुला कशाचं भय वाटतंय ग!"

"मुंगीसारखंच तुम्हास्नी एकादं डसल ह्याचं भय वाटतं पघा. कारभारी, गिरणीमंदी दहा वाटचे दहा मुसाफीर यायचे. कोन कस असल ह्याचा थोडाच भरवसा देता येतुंया! आपल्या शिरपुरात माझं काळीज कधी अस फडफड करीत नव्हत---पन् इथ येऊनशानी आता वरीस होईल--मला कशाच की भयच वाटतया!"

गिरजेच्या भाबड्या स्वभावाला श्रीपति मनापासून हंसला अन् कपडे काढून त्यानं हातपाय धुतले.

त्या रात्रीं मजेंत जेवण झालं अन् "उद्यांची" मनोराज्य करीत तो अंथरुणावर पडला. गंगा अन् मंजू केव्हांच निजली होतीं. चुलीजवळच्या खिळ्याला अडकवलेली चिमणी मिणमिणत होती; त्या मिणमिणत्या प्रकाशांत गिरजेचा चेहरा न्याहाळीत श्रीपत म्हणाला, "सांग, तुला काय घ्यायचं उद्यां?"

"काय बी नगं! तुम्हास्नीच कपडे घ्या. तुम्हास्नी भायेर जावं लागतं; आमचं बायामाणसाच काय?"

"नाहीं, मी ऐकणार नाहीं, तुला चागल चाळीस रुपयांचं लुगडं घेणार आहे मी. मुंबईला आल्यापासून तुला लुगडं घेणं झालंच नाहीं."

"नग नग, मला काय बी नग. गगा मजूला कुडतीं घ्या. तुम्हास्नी. ."

"तुझं मी कांही ऐकणार नाहीं. आतां गांवाकडे जाशील त्यावेळेस तुला नेसायला छानपैकीं लुगडं पाहिजे ना?"

प्रथम गिरजा कबूलच होईना. पण नंतर घुटमळत ती म्हणाली, "तुम्ही घेऊन देणार हे तर खरंच! पन लुगडं नग मला!"

"मग साग ना काय हवंय ते!"

"गंगाच्या जलमापासून तुम्ही बोलतासा कीं मला गोठ करायचे म्हून बारा तोळे चादी घेतली तरी ब्येस व्हतील पघा!"

"बर बरं! उद्या आपण जाऊ सराफाकडे. तू पण चल. गंगा–मजू सारीच जाऊं आपण! अन् सगळी खरेदी करू."

रात्री दहा रुपयाच्या त्या दहा नोटा उशाशीं घेऊन तो निजला.

सकाळ होताच त्यान रोजच्यापेक्षा जास्त दूध आणलं अन् त्याच्या घरच्या चहाला रोजच्यापेक्षा आज जास्त पांढुरका रंग आला.

नऊ वाजले तसं तो गिरजेला म्हणाला, "हे बघ, मी जरासा बाहेर जाऊन येतो. तोपर्यंत तं निघण्याची तयारी कर. आज घरीं भाकरी करायच्या नाहींत. बाहेर गेल्यावर तुम्हांला सगळ्यांना इतकं पोट भरून खायला घालतो कीं बस्स! मी आलोंच हं!" असं म्हणून तो निघाला.

त्याच्या चाळीसारखीच पलीकडे आणखी एक चाळ होती. तिच्या शेवटच्या खोलीपुढच्या ओट्यावर त्याचे तीन--चार सहकारी कामगार पत्ते खेळत होते. त्यापैकीं रामू मोठ्या खुशीत दिसत होता. श्रीपतला पहातांच तो म्हणाला, "काय रे, श्रीपती, कुठं निघालांस इतक्या सकाळींच!

जरासं दुर्लक्ष करीत श्रीपत म्हणाला " जरा काम आहेरे ! "

" काम कशाचं इतक्या लवकर ? आज आहे रविवार ! सुटीचा दिवस हे बघ. दहा मिनिटांत मी दहाचे पंधरा केले, तूं पण ये खेळायला !"

श्रीपतला पहिल्यापासूनच पत्ते खेळायचा कंटाळा ! त्याला वाटलं कुठून ही ब्याद आली कुणास ठाऊक !

" नको रे, " तो नाराजीनं म्हणाला, " मला काम करून लवकर परत यायचंय, नंतर बाजारांत जाऊन थोडीशी खरेदी करायची. . . . "

" हात् बेट्या, पैसे घालवण्याची कामं सांगा तुम्हाला. मी सांगतो कीं मी दहा मिनिटांत दहाचे पंधरा केले ये, ये, जराशी गंमत ! "

श्रीपत नाखुषीने बसला. हातात पत्ते घेतले अन् बिचकत खेळायला सुरवात केली. १५ मिनिटांच्या आंत त्याला एक रुपया मिळाला. त्याला हे फार छान ! आणखी १ –२ रुपये जास्त मिळाले तर तेवढंच बरे ! असे वाटले.

त्यान पायांतल्या चपला काढून ठेवल्या अन् नीट बैठक घातली. आणखी एक तासाच्या आत त्याला पाच रुपये मिळाले. त्याची हांव वाढली. ईर्षा वाढली. तन, मन, व " धन " अर्पण करून तो खेळूं लागला. पण. . ? थोड्याच वेळात रंग पालटला, बाजू उलटली अन् श्रीपतीचे आलेले पैसे परत जाऊं लागले. तो डगमगू नये म्हणून रामू त्याला धीर देत होता. शेवटी त्यानं आपलं पाकीट काढले. त्यांत बऱ्याचशा नोटा आहेत हें दिसून येतांच त्याच्या तिन्ही प्रतिस्पर्ध्यांनीं डाव खूप रंगविण्याच्या एकमेकांना खुणा केल्या.. पाकिटांतली एक नोट गेली.... दुसरीही गेली.... .. आतां मात्र श्रीपतीनं मिशीला पीळ घातला अन् शर्टाच्या बाह्या वर सारल्या ! !

. .ह्याच वेळेस त्याची कारभारीण त्याची वाट पाहात मोडक्या दाराच्या बुटक्या चौकटीत उभी होती. मुंबईला आल्यापासून इतका सुखाचा दिवस तिनं पाहिला नव्हता. म्हणूनच आज तिचं हृदय उत्कंठ आनन्दानं भरून गेलं होतं. गंगाधराला तिनं ठेवणीतली शर्ट–विजार घातली होती अन् मंजू धारवाडी खणाच्या चोळी–परकरांत सजली होती.

गिरजेनं मान वर उंचावून रस्त्यावर दूरपर्यंत नजर टाकली पण श्रीपत तिला दिसेना. अकरा वाजून गेले होते मंजूला भूक लागली, गंगाहि कुरकुर करू लागला. गिरजेनं पदर खोंचला, चूल पेटवली अन् आधण आल्यावर त्यात थोडेसे तांबडे तांदूळ वैचले.

अर्ध्या तासानं सकाळचं उरलेले दूध अन् आताचा ताजा भात मिटक्या मारीत खात असतांना गंगा म्हणाला, " आई, बाबा कधीं येतील ग ? लवकर येईन म्हणाले अन् अजून आले नाहींत. "

गंगाच्या ह्या बोलानी गिरजेच्या हृदयाला चटका बसला. गुदमरलेल्या आवाजांत ती म्हणाली, " येतील र सोन्या, वाईच कुठं काम निगालं असल, दुसरं काय ? "

....बारा वाजले–तरीही श्रीपत त्या चाळीच्या शेवटच्या खोलीपुढच्या ओट्यावर हातातले राजे–राण्या खेळवीत होता. खिशांतून जाणाऱ्या पैशां-बरोबर त्याची तहानभूकही नाहींशी होत होती. पण–तीन नोटा जातांच त्याचा त्वेष ओसरला. पैसे परत मिळावेत ह्या इर्षेनें तो खेळत होता. पण डाव सारखा हुकत होता–अखेर हताश मुद्रेनं निराश आवाजांत तो म्हणाला, " रामू, जातों मी ! "

" कुठं जातोस ? घरीं ? "

" घरीं ? " हे शब्द ऐकतांच त्याच्या डोळ्यापुढें त्याच्या सालस अन् भोळ्या पत्नीची मूर्ति उभी राहिली. तिला तोंड दाखविण्याची त्याला लाज वाटूं लागली. मुंबईला आल्यापासून त्याने ह्या साऱ्या वर्षांत एकदांही पैसे लावून पत्ते खेळले नव्हते. पण आज ? आज त्याच्या हातांतून घडलेलं पाप पत्नीसमोर उभं राहायला तयार नव्हतं.

त्याला तसं बावरलेलं पाहून रामू म्हणाला, " असं काय पहातोस रे ? तुझे तीस गेले तर माझे वीस गेले. जाऊं दे .. गमावल्याशिवाय का कुठं कमावता येतं ? चल, जरा शहराबाहेर जाऊं ? "

" शहराबाहेर ? कशाला ते ? "

" चल रे बाबा, तेवढाच विसर पडेल तुला. चल, चल ! "

हात धरून रामूने त्याला शहराबाहेरच्या रस्त्याला आणलं अन् थोड्याच वेळांत ते एका दुकानात आले, तिथ कांहीं शुद्धीवर माणसं होती तर कांहींनीं पैशाबरोबर आपली शुद्धीहि गमावली होती. जगाचा विसर पडून जमिनीवर लोळणाऱ्या त्या जहाल पेयाचा आस्वाद श्रीपतनं कधीं घेतला नव्हता असं नाही. त्याच्या गावांत दसरा, पिठोरी, पाडवा अन् होळी हे सण पेयाच्या प्राशनाशिवाय पूर्ण होत नसत. पण केवळ सणाचं शास्त्र म्हणून चाखलेली वेगळी अन् निराशेचा विसर पडावा म्हणून घेणं वेगळं !

विचित्र मनःस्थितींत दुकानांतल्या बाकावर येऊन बसल्यावर श्रीपत रामूला म्हणाला, " रामू, मी घेणार नाहीं हं. ! "

हसत हंसत रामू म्हणाला, " वा रे वा मी एकटाच घेऊं कीं काय ? " त्याला जास्त बोलायला अवसर न देतां रामूनं दोघाच्यासाठीं " असली माल " मागविला.

एक पेला रिकामा होतांच श्रीपतवर त्याचा अंमल चढूं लागला. त्याचे डोळे लाल झाले अन् डोक्यांत एक विचित्र परिभ्रमण होऊं लागलं. तेव-ढ्यांतच रामूनं त्याच्या हातांत दुसरा पेला अन् तोही रिकामा होतांच थोड्याच वेळात श्रीपतची मान समोरच्या टेबलावर आदळली.

दुकानदाराला ह्या गोष्टी नित्य–नियमाच्या होत्या. त्याचं लक्ष रामूकडे नव्हत, श्रीपतकडे नव्हते; लहानशा लाकडी पेटीत ठेवलेले पैसे तो पुन: पुन: मोजून पहात होता.

रामून पाह्यलं—दुकानदाराचं त्याच्याकडे लक्ष नव्हतं–अन् इतर दोन गिऱ्हाईकं होतीं ती देखील पण ह्या परमप्रिय पेयाचं प्राशन करण्यात गुंगलीं होती त्यानं डाव्या बाजूला कलटेलीं श्रीपतची मान हळूंच नीट केली अन् कोटाच्या डाव्या बाजूच्या खिशातील पाकीट काढून त्यांतले सारे पैसे काढून घेतले अन् दुकानदाराचं बिल देऊन तो पळून गेला.

....एकडे गिरजा मात्र श्रीपतची वाट पाहून नुसती कंटाळली, एव-ढंच नव्हे तर ती चाळीबाहेर येऊन हलवायाच्या दुकानापर्यंत जाऊन त्याचा शोधहि करून आली. तिला कुणीतरी सागितल कीं श्रीपत सकाळीं बराच वेळ चाळीज्या ओट्यावर बसून पत्ते खेळत होता. हें कळतांच तिच्या छातींत धडकी भरली. कधीं नव्हे तो घरांत पैसा आला, कधीं नव्हे तो श्रीपत तिच्याशीं खोटं बोलला अन् कधीं नव्हे तो आज तो पत्ते खेळला–हें सारे योगायोग तिला भयसूचक वाटले.

तिला भूक लागली होती ..सध्याकाळचे चार वाजले होते. सकाळ-पासून तिनं चहाखेरीज कांहीं घेतले नव्हते श्रीपत जेवल्याशिवाय ती जेवूं शकत नव्हती तरी तिला वाटणाऱ्या श्रीपतच्या काळजीपुढें तिच्या पोटाच्या खळगीची काळजी कमी होती भुकेच्या ग्लानीन तिचे डोळे

मिटत होते पण श्रीपतच्या काळजीने ते खाडकन् उघडले जात होते. तिनं ईश्वराच पुनः पुनः स्मरण केलं अन् पुनः एकदां रस्त्याकडे पाहिलं—

. . . ह्याच सुमारास श्रीपतनं डोळे उघडून पाहिल. दुकानासमोरच्या ओट्यावर तो पडलेला आहे अस त्यांला दिसून आलं. त्यान मान वळवली तसा पुंन्हा तो उग्र वास आला; त्याला आठवल; त्यानं मान वळवली तसा पुन्हा तो उग्र वास आला त्याला आठवलं . तो रामू . . ते पत्ते ती दारु त्यान अधीरतेने खिसा चांचपून पाहिला. पाकीट सुरक्षित दिसतांच त्याला किंचित् धीर आला. घरीं जाऊन गिरजेच्या पाया-वर मस्तक ठेवायचं हा विचार करीत तो उठला अन् चाडूं लागला. त्याचे पाय त्याला लवकर नेत नव्हते. पण मन शक्तीचा सणसणीत चाबूक त्यांना चालावयाला लावीत होना.

" जायचं अन् गिरजेच्या पायांवर मस्तक ठेवायचं " ह्या एकाच विचारानं त्याला भारून टाकलं होतं. अन् इकडे गिरजा चाळीच्या चिमुकल्या खोलींत विठोबाला आळवीत म्हणत होतं " कारभारीना सुखरुप घरीं येऊं दे, तुझ्या पायावर डोकं टेकायला आम्ही लवकर येऊं."

गिरजेनं पुन्हां रस्त्याकडे पाहिल....

श्रीपत खालीं मान घालून येत होता. ......

ती पुन्हां घरांत आली अन् दोन्ही मुलाना घेऊन दारात उभी राहिली, श्रीपत दारापाशी आला त्याचे कपडे खराब झाले होते. डोळ्यावर सुस्ती होती अन् तोंडाला वास येत होता. त्याला त्या स्थितींत पाहून गिरजेला एकदम हुदका आला.

ती कांहीं एक न बोलतां आत आली अन् कोपऱ्यातल्या वाकळ्यावर आपला देह झोकून देऊन अश्रू टाकूं लागली, तिच्याशीं बोलण्याची

श्रीपतला लाज वाटत होती तरीही तो तिच्याजवळ जाऊन म्हणाला, ' गिरजा चुकलों मी ! मला माफ कर. तूं म्हणालीस तसंच झालं. मला फसवलं अन् मी पुरता फसला गेलो; मी कबूल करतो, गिरजा, मी फसलो ग अगदीं !"

पण गिरजेनं मान वळवली नाहीं कीं ती काहीं बोललीहि नाही.

" गिरजा, माझ्याशीं बोलणार नाहींस तू ? रागाचे शब्द का होईनात— ण माझ्याशीं बोल ना ? ह्या वेळेस तू मला सावरलं नाहींस तर माझं कस होईल ? गंगाधर ये ! मंजू ये ! तूं तरी सांग तुझ्या आईला !" असं हणून त्यानं हात पसरले पण ह्या कधीं न पाहिलेल्या प्रकाराने ती दोन्ही मुलं इतकी गांगरून गेली की ती श्रीपतजवळ यायला तयारच होईनात !

श्रीपतला वाटलं कीं आपली मुलंहि आपल्याला पारखी झालीं - गिरजे-चाहि आपल्यावरचा विश्वास उडाला—आता तिला आपली कोणतीहि गोष्ट कधींही खरी वाटणार नाहीं यापेक्षां दुर्दैव ते कोणते ?

विषण्ण मनानं तो उठला अन् अंगांतला कोट काढून तो खुटीवर ठेवणार इतक्यांत त्यातलं पाकीट जमिनीवर पडलं. श्रीपतनं खाली वांकून ते हातांत घेतलं अन् तो एकदम दचकला. लगबगीनं त्यानं ते उघडून पाहिलं....तो मटकन जमिनीवरच बसला.... !! हा फटका जबरदस्त होता—ही ठोकर असह्य होती. त्याच्या जिवांत कालवाकालव होऊं लागली अन् डोक्यांत घणाचे घाव बसूं लागले.

किती तरी वेळ तो तसाच बसला होता. त्याची दृष्टि तीव्र होत होती अन् ओठ निश्चयानं घट्ट मिटले जात होते.

रात्रीचे अकरा वाजले होते. बहुतेक लोकांची निजानीज झाली होती. गिरजा एका फाटक्या कांबळावर झोपली होती. अन् गंगा, मंजू तिला

बिलगून निजली होती. श्रीपत हळूच त्याच्याजवळ बसला, त्यानं मंजूला कुरवाळलं, गंगाच्या अंगावरून हात फिरवला अन् गिरजेच्या कपाळावर आलेले केस त्यानं हळूवार हातानं सावरले. त्याच्यात अन् गिरजेमध्यें दूरतेचा पडदा पाडणाऱ्या दुर्दैवाचा फटका त्याला असह्य झाला.. .... त्याच्या डोळ्यातून खळकन् दोन अश्रू गिरजेच्या गालांवर ओघळले. त्याला वाटलं कीं गिरजेची आता झोंपमोड होणार—त्याच्या आतच........ तो हळूंच उठला, मिणमिणत्या चिमणीला फुंकर घातली अन् अंधःकाराच्या भीषण वलयांत त्यानं घराबाहेर पाऊल टाकलं.

पत्नीच्या प्रेमाला अन् मुलांच्या मायेला पाठीशीं घालून तो अंधारांत निघाला. रात्रीच्या अंधारात आपल्या अंधःकारमय आयुष्याचा अंत करावयाला तो निघाला......

त्याचं हृदय धडधडत होतं, पाय थरथरत होते ..नेवळ्यांत बाजारपेठेच्या गस्तवाल्यानं साडेअकराचा एक ठोका दिला . .दूरवर कुत्र्याच्या केंकाटण्याचा आवाज ऐकूं येत होता; अन् मधूनच एखादं लहान मूल किंचाळत होतं.........

ह्याच वेळेस चाळींत पलीकडच्या मोठ्या विहीरींत एकदम 'धपकन्' असा आवाज आला अन् एका फसलेल्या जिवान चिरशांतीच्या कुशींत आपलं मस्तक विसावलं.......!!

—लोकसत्ता ७।८।१९४९

# ४

# डोळ्याचं दान !



बाबा....., ! बाबाऽऽ !

आपल्या बापाला पहातांच मंजुळेनं हांतातली गोफण दूर भिरकावून दिली अन् माचव्याच्या लहानशा शिडीवरून झरझर उतरत ती त्याना सामोरी गेली. जानबा पाटलाना त्याच्या आनन्दाचा तो एकुलता एक ठेवा पाहून अत्यंत समाधान झालं. तरी पण वर वर विरोध दर्शवीत ते म्हणाले. 'मंजू—पोरी, तूं आता लहान का हायेस असं नाचाया अन् बागडाया ? आतां परवा पाडव्याला तुस्नी सोळावं वरीस लागेल व्हय ना ?'

त्याच्या अगरख्याच्या बंदाशी खेळत मंजुळा म्हणाली, "बाबा हे हो काय ? नेहमी नेहमी म्हणता मी मोठी झाले—मी मोठी झाले ! झाले मी मोठी ! मग!"

तिचे ते लाडिक रुसवे बोल म्हणजे ओढ्याच्या पाण्याची खळखळच वाटली जानबा पाटलांना ! तिच्या पाठीवरून हात फिरवीत ते म्हणाले, 'पोरी तूं काय करणार ? आतां मलाच तुझं लगीन कराया व्होवं !'

'हूंऽऽ ! लगीन' असं म्हणत मंजुळेन आपल्या अंगाभोवतीं एक गिरकी मारली अन् अंब्याच्या झाडाला बांधलेल्या झोपाळ्यावर ती जाऊन बसली.

'हूऽऽ! लगीन!' असं म्हणून मारलेल्या त्या गिरकीमुळे जानबाना तिच्या चेहऱ्यावर पसरलेली लाली पहातां आली नाही अन् ती दिसू नये म्हणून की काय तिनं जोरजोराने झोके घ्यायला सुरवात केली.'

जानबा कामाला निघून गेले अन् मंजुळेचं मन गेल्या बाजाराच्या रम्य आठवणींच्या हिंदोळ्यावर झोके घेऊ लागलं.

× × ×

पिंपळगांवचा आठवड्याचा बाजार मंगळवारीं भरत असे. सोमवारीं संध्याकाळीं मळयातून आणलेली संत्री, मोसंबी अन् पपया गड्याकडून गाडीत भरवून घेत असताना मंजुळा जानबाना म्हणाली, 'बाबा, उद्या मी येणार बाजाराला!'

'नको पोरी उन्हाळ्याचे दिस हैती. लई कडक उन्ह असतंया!'

पण जानबाचं ऐकायला ती कुठं तयार होती?

'नाही—मी येणार! बाबा—मी येणार!' ती म्हणाली.

अन् मंगळवारीं मोठ्या पहाटे जानबाच्या मळयातील सौंदर्याची खाण पिंपळगावच्या बाजारात अवतरली!

यापूर्वी मंजुळा बाजाराला येत असे ती केव्हा तरी मधूनच महिन्या—महिन्यांनी! अन् तीहि केवळ बाजाराची 'गम्मत' पाहण्यासाठी! तास दोन तासांनी ती गाडीतून परत मळयात जात असे. पण आज मंजुळा बाजारात आली ते सबंध दिवस जानबांच्याजवळ दुकानावर बसण्यासाठीं!

शहरचा आठवड्याचा बाजार तो! धान्याच्या, फळाच्या, कापडाच्या, भाजीपाल्याच्या अशा प्रत्येक ओळी वेगवेगळ्या राखून ठेवलेल्या! फळाच्या रांगेतलं तिसरं दुकान जानबांच होतं. गाडीतल्या फळांचे ढीग बाहेर रचण्यात आले. अन् टपोरीं संत्रीं निवडून त्यांना लाल गुलाबी रंगाचे

कागद लपेटण्यांत आले. अन् जानबा पाटील नेहमींच्या गिऱ्हाइकाशीं 'बातचीत' करण्यांत गुंग झाले.

मंजुळेनं पाहिलं. एक—दोन—तीन—अशीं फळाचीं आठ दुकानं समोरा-समोर बसलीं होतीं. नेहमींचे ओळखीचे दुकानदार—त्यांचे नेहमींचेच नोकर अन् मोसमांतील तीं नेहमींचींच फळं.... !

दहा वाजले. सूर्य वर येत होता. तसतसा बाजारहि माणसांनीं नुसता फुडून जात होता.

इतक्यांत समोरच्या चौथ्या दुकानापाशीं एक बैलगाडी येऊन थांबली. बैलांच्या गळ्यांतील घुगुरांचा नाद थांबला. चाकाची घरघर थांबली अन् गाडीवानानं बैलाच्या पाठीवर प्रेमानं मारलेली थापहि मंजुळेनं ऐकली. अन् तिची इतकी वेळ दुसरीकडेच लागलेली दृष्टी त्या दिशेकडे वळली.

गाडींतून उतरणाऱ्या माणसाच्या पायांतला झोंकदार नवा करकरीत बूट तळपत्या उन्हांत चमकला अन् क्षणार्धात त्या माणसानं गाडींतून उडी मारलेली दिसली. नोकर पुढे धांवले व त्यांनीं लवून मुजरा केला. दुकानावरच्या वृद्ध माणसानं जरासं नाराजीने म्हटलं, 'रायबा किती येळ केलास तुवां ? मी तुझी कव्हापून वाट पाहातुया ! बघ बैस हतं. दुकानावरली इस्त्री तुझ्या नजरंखाढून गेली तर व्येस व्हईल ! '

रायबा हंसला व त्यानं उगीच इकडे तिकडे पाहिल्यासारखं केलं.

मंजुळेनं पाहिलं. विशीच्या आसपास घोटाळणारा हा तरुण असावा तरी कोण अन् कुठल्या गांवचा, असा विचार तिच्या मनांत येऊन गेला. तेव्हढ्यांत जानबा पाटील एकदम ओरडून म्हणाले,'अरे कोन ? रायबा— तूं ? अरे, तूं तर वळखूं बी येईनास ! कव्हा आला गांवाकडं ?'

‘कालच आलो बाबा ! बरी खुशाल आहांत ना सगळीं !’

‘सगळीं कोण रे ? मी नी माझी मंजुळच की !’

अन् यावर पदर सावरून मंजुळेनं रायबाकडे दृष्टी टाकली. रायबाहि अतिशय आनन्दान अन् उत्सुकतेनं तिच्याकडे पाहात होता.

मुग्ध अन् शान्त हृदयानं वळवलेली रायबावरची दृष्टी दूर करतांना मंजुळेचं हृदय एकदम धडधडलं.

रायबाचे डोळे मंजुळेवर खिळले होते. मंजुळेची नजर जमिनीवर लागली होती अन् जानबांची दृष्टी रायबाला न्याहाळीत होती.

समोर बसलेल्या रायबाच्या वडिलानीं तेवढ्यात म्हटलं, ‘व्ह हो जानबा पाटील, रायबा आलाया ममईस्नी ! पघा ! तुम्ही तरी सांगून पघा! ममईलाच ऱ्हायचं म्हणतुया ! मग माझं म्हाताऱ्याच कसं व्हईल हो ?’

पण ह्याचं उत्तर जानबा देऊं शकले नाहींत. दुकानाजवळ उभं राहून हातांत एक संत्रं झेलीत गिऱ्हाइकानं त्यांना तितक्यात विचारलं ‘कशी डझन ?’

जानबांनीं आपल्या मालाची जराशी स्तुती केली व भाव सांगितला.

पुन्हां रायबाकडे पहायचं नाहीं असं मनानं परोपरीनं बजावलं असतांहि हृदयाच्या संदेशानुसार तेवढ्या वेळांत रायबाकडे दोन नयनबाण फेकले गेले अन् ह्या माऱ्यानं सुखावल्यामुळेच की काय रायबाच्या ओठावर हास्यरेखा उमटली.

थोड्या वेळानं, अगदीं न राहवून मंजुळेनं वडिलांना विचारलं, “बाबा, कोण हो हा ?’

‘हात पोरी, आपल्या खेरवाडीचा रामू बागवानाचा पोर रायबा इसरलीस व्हय ?’

'रामू बागवानाचा पोर रायबा' हे शब्द ऐकून मंजुळेचे डोळे एकदम विस्फारले गेले. आपल्या उजव्या हातानं डाव्या मनगटावर हळुवार हात फेरवीत ती मनाशींच खुदकन् हंसली.

× × ×

पिंपळगांव अन् खेरवाडी यांत फार तर एक मैलाचं अंतर असेल. रामू बागवानाचा बारा वर्षाचा रायबा आपल्या मित्रांसह पिंपळ गांवच्या बोरांच्या वनांत बोरं अन् चिंचा पाडायला नेहमीं यायचा! जानबांची मंजुळा अवघी आठ वर्षाची पण भारी अल्लड! धारवाडी खणाची चोळी-परकर नेसलेली मंजुळा वेळ पडली तर रायबांशी भांडूनहि जास्त बोरं गोळा करीत असे. रायबाला राग यायचा, पण तो क्षणभरच टिकायचा! मंजुळा ही त्याची आवडती मैत्रिण! ती आपल्याशी भांडली हरकत नाहीं, पण ती सदैव हसरी दिसली पाहिजे ही त्याची इच्छा! तो दगड मारून बोरं पाडीतच राहायचा अन् लहानगी मंजुळा पाय नी कंबर मोडेपर्यंत वेचतच राहायची!

परकराच्या घोळांत जमवलेलीं बोरं-चिंचा संभाळतां संभाळतां मंजुळा म्हणायची, 'रायबा तूं किती चांगला आहेस रे? दुसरीं पोरं कुण्णीं देत नाहींत चिंचा अन् बोरं! घे, हीं घे तुला.' असं म्हणून आपल्या चिमुकल्या ओंजळींत मावतील तेवढीं बोरं ती त्याला देत असे.

त्यातलं एक बोर चाखून बघत रायबा म्हणायचा, 'किती गोड! तुझ्या बोलण्यासारखंच गोड गोड आहे बघ!'

आपल्या मित्रानं केलेली स्तुति ऐकून मंजुळा आनन्दून जायची अन् या आनन्दाच्या भरांतच उड्या मारीत घराकडे जातांना ती म्हणायची. 'राया, उद्यां ये हं!'

अन् ' हो हो, उद्यां येईन कीं ! ' असं म्हणत रायबा आपल्या गांवा-कडे धांवायचा !

एकदां काय झालं कीं बोराचे दिवस संपत आले होते. रायबा एका पाठोपाठ सारखे दगड मारीत होता. अन् दगड मारतां मारतां सारखा म्हणत होता, ' मंजु, थांब, मी खूप बोरं पाडतो बघ ! हीं बघ ? पडलीं—उचल—उचल ! '

मंजुळा बोरं उचलण्यासाठीं वांकायला अन् झाडाच्या फांदीवर पानांत अडकून बसलेला एक दगड तिच्या हातावर पडायला एकच गांठ पडली.

' आईऽऽऽग ! ' मंजुळा किंचाळली. तिच्या मनगटावरच्या जखमेतून रक्ताचे थेंब ठिपकूं लागले.

' बाप रे ! मंजू, थांब. ' असं म्हणत रायबान तिच मनगट घट्ट आंव-ळून धरलं अन् विनवणीच्या स्वरांत तो म्हणाला, ' कसा ग लागला तुला दगड ? मी मुद्दाम नाहीं ग मारला. शपथ ! माझ्यावर रागावूं नकोस. नाहीं ना रागावणार ? '

रायबाच्या डोळ्यांत आसवं जमा झालीं अन् मंजुळेनं ती आपल्या हातांनीं पुसलीं.

तिची ती जखम पाहून तिची आई कळवळली अन् जानबा पाटलांनीं तिला बोरांच्या वनांत जाण्याची बंदी केली.

त्यानंतर आजपर्यंत रायबाची अन् तिची गांठभेट नव्हती किंवा तो कुठं आहे व काय करीत आहे हें देखील तिला माहीत नव्हतं. मात्र हृदयांत त्याची आठवण घर करून राहिली होती अन् मनगटाच्या जख-मेचा तो वण जास्त जास्त आठवण करून देण्याला कारणीभूत झाला होता.

अन् आतांहि तिनं आपल्या उजव्या हातान डाव्या मनगटावर हळूवार हात फिरविला अन् ती मनाशींच खुदकन हंसली! .

संध्याकाळ झाली. गाड्या जुंपायला सुरवात झाली. उरलासुरला माल गाड्यांतून भरला गेला अन् कमरेच्या कशात आजवी मिळत दडवून प्रत्येक दुकानदार आनन्दानं घराकडे वळला.

जातां जातां जानबा म्हणाले, “ रायवा मळ्याकडं येऊन जा एक वखत, कंदी येशील ? ’

‘ वरं बाबा ! आज मं ळवार ना ! मी गुरुवारीं येईन पहा. चालेल ? ”

‘ हां ! हां ! बेस ! ’ असं म्हणत जानवा पांटील गाडींत चढले नि आपल्या लेकीशेजारी जाऊन बसले.

× × ×

गुरवारचा दिवस उगवल्यापासून जानबांच्या मळ्यांतल्या त्या घरांत मंजुळेच्या तरुण हृदयाची नुसती धांदल उडाली. बाहेरच्या ओटीवर बसलेलीं माणसं आंतल्या खोलीच्या खिडकीतून पहातां येत असत अन् तेहि पहाणारं माणूस दृष्टीस न पडतां !

चार वाजतां गाडीच्या बैलांच्या घुंगुरांचा निनाद ऐकू आला अन् त्या पाठोपाठ रायवाच्या हास्याची लकेर मंजुळेच्या हृदयसारंगीवर झंकारून गेली.

दहापंधरा मिनिटं खुशालीच्या गोष्टी झाल्यावर जानबा म्हणाले, ‘ मंजू, पोरी, पाव्हन्यास्नी च्यापानी कर कीं वाईच ! ’

मजुळेच हृदय पुन्हां धडाडलं.

चहाची पितळी कपबशी घेऊन मंजुळा बैठकीच्या दाराशीं गेली व तिथंच तिन चहा ठेवला. रायवान दरवाजाकडे पाहिलं.

अंजिरी टोपपदरी लुगड्याचा लालभडक कांठ मंजुळेच्या खांद्यावरून खालीं लोंबत होता. तिच्या अंगांतली काळी रेशमी चोळी त्यावरच्या पांढऱ्या कशिद्यामुळें उठून दिसत होती. तिच्या कपाळीं नेहमींप्रमाणेंच कुंकवाची ठळकशी चंद्रकोर विसलत होती. तिचे हात थरथरत होते अन् चहाची कपबशी खालीं ठेवण्यासाठीं वाकतांना तिच्या डोक्यावरचा निसट-लेला पदर, तिच्या काळ्याभोर केशसंभाराची शोभा अर्धवट कां होईना पण दाखवीत होता.

रायबाची दृष्टी दरवाजांतल्या चित्रावरून हलत नव्हती.

चोळीपरकर नेसणारी ती अवखळ अन् अल्लड मंजुळा इतकी लावण्य-वती दिसावी ह्याचा त्याला अचंबा वाटत होता.

त्यानं चहा घेतला व चहांतल्या साखरेपेक्षांहि गोड असं मंजुळेचं दर्श-नहि आणखी एकदां घेतलं आणि तो निघाला. जानबा त्याला पोंचवा-यला बाहेर आले नाहींत.

परसांतल्या कुंपणावरून खेरवाडीची वाट होती. मंजुळा आडोश्याला उभी राहून आपल्या नेत्रदीपांचं दर्शन घेत होती. रायबा जवळ आला. त्याचं लक्ष तिच्याकडे होतंच. जातां जातां तो तिला म्हणाला, ' ओळ-खलंस ना मला ? '

आपल्याला रायबा कांहीं विचारील असं मंजुळेच्या स्वप्नांतहि नव्हतं. ती बावरली व आपले हरिणीसारखे असणारे डोळे विस्फारून ती नुसती हंसली.

' उद्यां आमराईकडे जाणार काय ? ' त्यानं पुन्हां उत्सुकतेनं विचारलं.

तिनं उत्तर दिलं नाहीं फक्त मान हलविली ..

× × ×

दुसरे दिव·शीं सकाळीं जानबा आमराईकडे गेले अन् त्यांच्या पाठोपाठ मंजूळाहि निघाली.

तिला मळ्यांत येऊन फार तर अर्धा तास झाला असेल, कुंपणाजवळच्या पेरूच्या झाडाजवळ कांहीं सळसळलं. माणसाच्या पावलांची चाहूलहि तिला ऐकूं आली अन् दुसऱ्याच क्षणी रायबाचे पाणीदार डोळे तिचा शोध घेत असलेले तिला दिसले.

जानबा पाटील आमराईच्या पलिकडच्या टोकाला देखरेख करीत उभे होते. रावबाला पाहून मंजुळे आनंद झाला. तितकीच भीतिहि वाटली.

लहानपनापणीं ती तासन् तास रायबाबरोबर खेळत असे पण आता रायबाच्या सहवासांतील एकेक क्षण तिला एकेक नवनवीन भावनांची प्रचीती देत होता.

वयात आलेल्या मंजुळेने एका तरुण पुरुषाशीं एकान्तात बोलावं हें त्या गांवाला पटल नसतं; तिच्या बापाला पटलं नसत. म्हणूनच घाबरून ती म्हणालीं, ‘ हे काय ? तुम्ही इथं कशाला आलांत ? नको नको, ते पहा बाबा ! मला असं इथं कुणी पाहिलं तर ? नको—रायबा पाटील.... ..’

यण पुढचे शब्द तिच्या शुष्क ओठाबाहेर पडले नाहींत. ‘ रायबा पाटील ’ हे शब्द उच्चारतांच तिच्या हृदयात ज्या विशिष्ट संवेदना उमटून गेल्या त्यांचं आविष्करण तिच्या नेत्रांत होत होतं. ओठ त्याला जायला सांगत होते, पण डोळे म्हणत होते–‘ कुठं होतास तूं इतकी वर्षं ? लहानपणीं माझा सवंगडी म्हणून खेळलास अन् जो नाहींसा झालास तो आठ दिवसांपूर्वीं तूं मला दिसलास अन् तेव्हांपासून तं मला सारखी हुरहूर लावली आहेस. राया–कुठं होतास तूं ? ’

'मंजुळे, थांब, वेळ घालवूं नकोस. हे बघ, काल मी तुमच्याकडे आलो होतों तेव्हां तुझ्या बाबांजवळ मी तुला लग्नाची मागणी घातली. पण ते तयार नाहीत. शेत–मळे असलेला अन् त्यांतच लक्ष घालणारा जांवई त्यांना पाहिजे आहे. मी नेहमीं मुंबईला जातो ते त्याना पसंत नाहीं. मी मुबईस कोणत्या कामासाठीं जातों ते त्यांना माहीत आहे की नाहीं कोण जाणे. पण त्यांचा गैरसमज फार खोल आहे . मी त्यांना पसंत नाही. पण मीं तुला मागणीं घातली अन् ..'

मंजुळेनं खाली मान घातली अन् डोक्यावरचा पदर नीट केला. तिच्या डोळ्याची उघडझाप हाताची थरथर अन् शुष्क झालेल्या ओंठावरून जीभ फिरविण्याचा तो चाळा रायबाला मोहित करीत होता.

'ऐक मी मुंबईला जातो ते त्यांना पसंत नाहीं. मुंबई शहर म्हणजे पापाची खाण–खेड्यातला माणूस तिथं गेला की बिघडलाच म्हणून समजा असं त्यांचं म्हणणं! माझ्या मनात अजूनपर्यंत लग्नाचे विचार आले नव्हते. पण परवांच्या बाजारांत तुला पाहिली अन ..मंजू लहानपणीं आपण किती वेळा एकत्र खेळलों ग! सांग–सांग–मंजू मी तुला कसा वाटतो ग? जानबा पाटील काहींहि म्हणू देत, पण मी तुला कसा वाटतों ते सांग ना?'

इतक्यांत 'राम्या ऽऽऽ' अशी जानबांनीं नोकराला मारलेली हांक दोघानीं ऐकली. अन् मंजुळा घाबरून म्हणाली, 'जा! जा तुम्ही! नाहीं तर माझा न् तुमचा घात झालाच म्हणून समजा. जा. जा. माझ्या प्राणाची शपथ आहे तुम्हांला!' असं म्हणून तिनं आपल्या धडधडत्या हृदयावर हात ठेवला.

अन् रायबा लौच निघून गेला.

रायबा निघून गेल्यावर मंजुळेच्या मनावरचं ओझं कमी झालं खरं, पण तिच्या हृदयांत भावनाचा इतका हलकल्लोळ माजला कीं जानबांना पहातांच तिनं त्याना एकदम मिठी घातली व आवेगानं हाक मारली, 'बाबा!'

तिचं ते वागणं जानबांना मोठं गमतीचं वाटलं. उन्हानं तापलेल्या तिच्या चेहऱ्यावरून हात फिरवीत ते म्हणाले, 'पोरी, काय झालंया असं? उन्हामंधी कशापायीं उभी ऱ्हायलीयास? चाल! चाल झोपडीकड!'

पित्याच्या छातीवर विसावलेलं मस्तक तिनं हळूच वर उचललं अन् त्याच्या चेहऱ्याकडे निरखून पहात ती पुन्हा म्हणाली, 'बाबाऽऽ!'

तिच्या त्या रडवेल्या न् असहाय उद्गाराचं जानबांना जास्तच नवल वाटलं अन् तिला घेऊन ते झोपडीकडे गेले....

× × ×

ज्या दिवशी जानबाच्याकडे रायबानं पुन्हा एकदां मध्यस्थी करण्याकरिता माणूस पाठविला अन् ज्यावेळेस मंजुळेचाहि रायबाकडे कल असलेला दिसून आला, त्यावेळेस जानबांनी रागान सारे घर डोक्यावर घेतलं—सारी आमराई दणाणून सोडली अन् सारं आकाशपाताळ एक करून टाकलं.

'काय! माझी पोर काय अशी वाटंवर पडलिया कीं मी तिला अशा ममईच्या मुसाफिराला देऊं! मर्दासारखा मरद असून शानी बाईलची मागणी कराया येतुंया! माझ्या तोडीचा अन् माझ्या मानाचा जांवई मला पायजे. ममईला जाऊन शानी नाचतमाशे पहायचे अन् मग इकडे कष्ट कोन करील? माझी एकुलती एक पोर! माय नाहीं पोरीला म्हून जरा लाडानं न् लोभानं म्होटी व्होऊं दिली पन् ती पोरगी बी रडत बसलीया. 'मंजू ...कुठं गेली ही? मंजू....?'

असं म्हणत ते घरभर तिला शोधूं लागले. जानबा सहसा कधीं रागावत नसत, पण रागावले म्हणजे सगळं घर गरजून टाकीत. म्हणूनच आतां सगळीं नोकरमाणसं घाबरून गेलीं. अन् मंजुळा? धान्याच्या खोली-जवळ एका कोपऱ्यांत बसून ती मुसमुसून रडत होती. तिनं भितीला मान टेकली होती व हातांत तोंड झाकून ती रडत होती. तिचा चेहरा लाल झाला होता. रडून रडून डोळे सुजले होते. केस पार विस्कटून गेले होते अन् पदर अस्ताव्यस्त झाला होता.

आपल्या लाडक्या लेकीची ती अवस्था पाहून जानबाना अतिशय दुःख झालं. हळूंच ते तिच्याजवळ जाऊन तिच्या पाठीवरून हात फिरवू लागले. मायेच्या त्या स्पर्शानं मंजुळेला जास्तच भडभडून आलं अन् त्यांच्या कुशींत शिरून ती म्हणाली, 'बाबा माझी आई कुठं आहे हो?'

तिच्या त्या प्रश्नानं जानबा एकदम चरकले. मंजू दहा वर्षांची असतांना तिची आई वारली. नवीन नवीन तिला आईची आठवण व्हायची, पण पुढें जानबांच्या मायेच्या उबाऱ्यांत ती आपल्या आईची आठवण विसरली. अत्यंत आनन्दाच्या काय किंवा दुःखाच्या काय—कोणत्याहि वेळीं तिला आपल्या पित्याची आठवण आधीं व्हायची अन् म्हणूनच आतां ह्या क्षणीं मंजुळेनं आपल्या आईची आठवण केलेली पहाताच जानबा एकदम चरकले. जें मी करूं शकत नाहीं ते तिची आई करूं शकली असती असं तिला वाटतंय कीं काय, ह्या विचारानं त्यांना पुरतंच ग्रासून टाकलं; त्यांच्या हृदयानं पड खाल्ली होती. पण मन? छे! ते वज्रापेक्षांहि कठोर होतं. त्यांच्या दृष्टीनं रायबासारख्या रंगेल तरुणाशीं मंजुळेची गांठ घालून देणं म्हणजे तिच्या आयुष्याची नासाडी करण्यासारखंच होत!

कांहीं एक न बोलतां ते तेथून उठून गेले.

आठ दिवस झाले—पंधरा दिवस झाले—महिना झाला. पण जानबाच्या घरांतलं वातावरण मात्र कुद्धच राहिलं. मंजुळेला अजून आपल्या आयुष्याची पूर्ण कल्पना आली नाहीं अन् म्हणूनच ती आपला हट्ट चालू ठेवीत आहे, अ" जानबाना वाटत होतं. त्यांनीं तिला परोपरीनं सांगून पाहिलं. रायबा रंगेल होता. गावांतून मुंबईला जातांना तो बरोबर पैसे घेऊन जात होता, अन् येतांना मोठ्या चैनीच्या वस्तू घेऊन येत होता. मळ्यात बापाबरोबर काम करीत नव्हता. आणखी काय पांहिजे? जानबांच्या विरोधाला रायबाची ही नादानपणाची लक्षणं जास्त तीव्र बनवीत होतीं. पण ते खरं होतं काय?

रायबा मुंबईला जात होता ते चैनीसाठीं नव्हे! आपल्या मळ्यांतल्या रसदार फळांचा मुबईत खप व्हावा अशी त्याची इच्छा होती. सहा महिन्यांपासून त्याचा मुंबईसच एका दलालामार्फत सगळा व्यवहार होता. पण दलाली अन् लबाडी हातांत हात घालून चालत होत्या. तो माणूस जास्त टक्के नफा आपल्या वांट्याला घेई व रायबाच्या हातावर ठराविक पैसे ठेवी. रायबाचं म्हणणं असं कीं दलाल ठेवण्यापेक्षां स्वतः देखरेख करून फळांची घाऊक विक्री करावी व जाण्यायेण्याचा खर्च वजा जातां बाकीचा सारा नफा आपला आपणच घ्यावा.

रायबा तरुण होता, पण रंगेल नसून हौशी होता. उधळ्या नसून जरा खर्चिक होता. पण जानबाचा गैरसमज? तो केवळ 'जिवाची मुंबई' करायलाच मुंबईला जातो असें त्यांचं म्हणणं—हा केवढा गैरसमज होता!

अन् ह्याचसाठींच मंजुळा रायबाची पत्नी होऊं शकत नव्हती.

× × ×

दिवस जात होते. लग्नाचे मोसम जवळ येत होते. पण जानबाच्या घरांत मात्र औदासीन्यच पसरलं होतं.

रायबाच्या मागच्या भेटीनंतर पुन्हा मंजुळा त्याला भेटली नव्हती. रायबा मात्र रोज आमराईकडे येऊन तिची वाट पहात होता.

एके दिवशीं घरांत बसून कंटाळा आला म्हणून मंजुळा मळयांत गेली. कुढत बसण्यापेक्षां आपल्या लेकीनं रोज मळ्यांत यावं अशी जानबाची पण इच्छा होती. म्हणूनच तिला पाहून आनन्दून ते म्हणाले, 'असं उगाच कां म्हून बसून ऱ्हायचंया ? कांईबी काम कर. चल ! काय करतीस बोल ! पपाया रचून ठुतीस का गोफण मारतीस ?' 'द्या, गोफणच द्या बाबा ! पुष्कळ दिवसात मीं गोफण नाहीं फिरवली.' तिनं गोफण घेतली अन् माचव्यावर उभी राहून फिरवायला सुरवात केली. चिमण्यां पाखरं फळांतल्या आपल्या चोची काढून घेऊन भीतीनं उडून जाऊं लागलीं.

भर दुपारची वेळ! सगळीकडे शान्त होतं अगदीं! त्यामुळें गोफणीं-तल्या दगडाचा गुं ऽऽऽ घूं ऽऽऽ असा आवाज मोठा चमत्कारिक वाटत होता. पण त्या आवाजानंच मळयाच्या बाहेर कोपऱ्यांतल्या एका झाडाखालीं विसांवलेला रायबा एकदम ताडकन् उठून बसला अन् त्यानं माचव्याकडे पाहिलं.

मंजुळा त्याला पाठमोरी दिसत होती. ह्या एक महिन्यांत ती बरीच कृश झालेली दिसत होती. तिनं पदर पुढें खोंचला होता आणि तिची केशरचना नेहमींप्रमाणें व्यवस्थित नव्हती.

त्यानं तिला पाठमोरी डोळे भरून पाहिली, पण त्याच्या तृषित नेत्रांचं समाधान झालं नाहीं. तिला सामोरा जाऊन तिच्याशीं दोन शब्द बोलण्याची इच्छा इतकी उत्कट झाली कीं तो उठून चालायलाच लागला.

गोफणींतून दगड उडत होते. रायबा तिच्या अधिकाधिक जवळ येत होता. पन्नास एक पावलांच अंतर उरलं असेल नसेल, तो तिला उत्कटेन ' मंजुळा ' हांक मारणार होता. ओठ हलले देखील; पण ओठांतून ती अक्षरं बाहेर पडण्याऐवजी ' अयाई ऽऽ ! ' असा आर्त स्वर बाहेर पडला.

तो आर्त स्वर ऐकून मंजुळेची गोफण थांबली. तिनं पाहिलं–तिचा प्रियकर एका हातातं डोळा झांकीत कोलमडून खालीं पडत होता !

तिला क्षणभर चक्कर आल्यासारखी वाटली; पण तिनं स्वतःला सावरलं अन् माचन्यावरून उडी मारून बापाला हाक मारीत ती रायबा-कडे धांवली.

जानबा पाटीलहि धांवत आले. त्याना एकदर प्रकारची एकदम कल्पना आली. झटकन् त्यांनी रायबाचं मस्तक आपल्या मांडीवर घेतलं व आपल्या फेट्याच्या सोग्यानं ते वारा घालूं लागले. रामा गडी पाणी आणायला धांवला व मंजुळा आपल्या पदरानं त्याच्या डोळ्यावाटे गळणारी रक्ताची धार टिपून घेऊं लागली.

तिनं आपले हुंदके आवरून धरले, अश्रू थोपवून धरले; नव्हे एवढंच पण हृदयांत प्रबळ झालेल्या अनेक भावना हृदयाची कोंडी फोडून बाहेर येण्यासाठीं धडपडत होत्या–त्यांनाहि तिनं थोपवून धरलं.

× × ×

रायबा जेव्हां शुद्धीवर आला त्यावेळेस त्याच्या डोळ्यावर कसली तरी पट्टी बांधली असं त्याला दिसून आलं. शहरचा डॉक्टर नुकताच परत गेला होता. रायबाला मधूनमधून ग्लानी येत होती. मंजुळा त्याच्याजवळ बसली होती व जानबा पाटील रायबाच्या बापाची वाट पाहात होते.

गाडीतून रायबाचे वडील उतरतांच त्यांना एकदम हुंदका आला व उपरण्यानं त्यांनीं आपले डोळे पुसले. एवढा मोठा कर्तासवरता मुलगा डोळ्यानं अधू व्हावा हे दुःख त्यांना फार मोठं होतं. तो मुंबईस जायचा तेव्हा विरहहि त्यांना सहन व्हायचा नाही. ते मोठमोठ्यानं हुंदके देत त्याचं गुणवर्णन करूं लागले—

'कुठय् माझा रायबा? मला पाहूं द्या—'

'नग, नग. थांबा थोडं. आतांच डाक्टर येऊन गेल्यात! जराशी झोप लागलीया रायबास्नी! थांबा वाईच!'

इकडे रायबाच्या खोलीत मंजुळा रायबाचे पाय अश्रूंनी न्हाणून विचारीत होती, 'मला माफ करा. हो म्हणा, मला क्षमा करा.'

अन् रायबा म्हणत होता, 'हाय! माझा डोळा! मंजू! मंजू! तुझ्या प्रीतीनं माझ्या डोळ्याचं दान करवून घेतलं ना शेवटीं? आतां तरी तूं माझी होशील का? छे, छे.! पण आता ते कसं शक्य आहे?'

'रायबा, मला लागेल ती सजा द्या! पण मला क्षमा करा! 'हो' म्हणा! 'हो' म्हणा!' असं म्हणून विकलतेनं मंजुळेनं आपलं मस्तक त्याच्या पायांवर टेकलं.

'हो मंजू! पण तूं माझी होशील ना?'

मंजुळेनं उत्तर देण्याऐवजी दाराकडे पाहिलं. जानबा अन् त्यांच्या पाठोपाठ रायबाचे वडिल येत होते. जानबाच्या मनांतली संशयाची मेघपटलं नाहींशीं झालीं होती. प्रसन्नतेनं ते म्हणाले, 'व्हय! व्हय! रायबा, पाटील आमच्या पोरीचा अपराध तर लई मोठा हाय पन आपुन तो पोटांत घाला अन् तिला पदरांत घ्या.'

× × ×

लग्न लागलं. हळद किटली. अन् पहिल्या भेटींत रायबा म्हणाला, 'मंजुळे, माझा डोळा गेला, पण मी तुला पहिल्यासारखाच आवडतो ना ?'

लाजतच पण धीटपणानं मंजुळा म्हणाली, ' हे काय विचारणं ? तुमचा डोळा सुन्दर होता, पण त्यापेक्षां तुमचं हृदय सुन्दर आहे. ते मला जन्मभर वेड लावील.'

निरतिशय आनन्दानं रायबानं आपला हात पुढे केला अन् मंजुळेची बोटं त्याच्या बोटांत नकळत गुंफली गेली ! !

—" यशवन्त", मे १९४९

५

# ते दोन निळे बंगले!



युनिव्हर्सिटीच्या डावीकडच्या पोर्चमधून रोशन ज्या वेळेस बाहेर पडली त्या वेळेस तिच्या चेहऱ्यावर आनन्दाचं साम्राज्य पसरलं होत. गडबडीनंच ती लेडीजरूममध्यें शिरली; इकडे तिकडे विस्कळीतपणाने सरकावलेल्या खुर्च्यामधून वाट काढीत ती कोपऱ्यातल्या पुस्तकांच्या शेल्फजवळ जाऊन आपली पुस्तकं पाहूं लागली. खालच्या खणांतील पुस्तकं तिने काढून घेऊन आपली पर्स उघडली, चेहरा नीट न्याहाळून पाहिला, केस नीट-नेटके केले अन् कट् असा चाप दावीत पर्स बंद केली. उजवीकडच्या कोपऱ्यांतल्या टेबलावर बसून नीला घारपुरे अन् जहानआरा याचा कसला तरी वाद अगदीं रंगांत आला होता. पुस्तकं अन् पर्स घेऊन रोशन त्याच्याजवळ आली अन् कांही एक न बोलतां तिन टेबलावरचा विजेचा पंखा सुरू केला. ते पाहून नीला एकदम म्हणाली “ हे ग काय रोशन ? ”

“ अग तुमची डोकीं बरीच गरम झालेलीं दिसताहेत म्हणून जरा शांत राहण्यासाठीं ...” रोशन असं म्हणत असतांनाच जहानआरानं उसन्या रोषानं डोळे एवढे मोठे केले. मिस्किलपणानं हसत रोशन दारा-पाशीं आली. केवळ कॉलेजमधील ‘ जमान्या ’च्या तैनातिसाठीं ठेवलेली सरकारी मोलकरीण सकीना रोशनला पाहून पुढं आली अन् आपली

लालभडक दंतपक्ति विचकून तिनं तिला 'कुर्निसात' केला, त्याचा स्वीकार करून रोशन आपल्या निळ्या गाडीच्या रोखानं जात असतांनाच हुसेन शोफर सामोरा आला. अन् तिच्या हातांतलीं पुस्तकं घेऊन त्यानं लगबगीनं गाडीचं दार उघडलं- गाडींत बसल्यावर ती म्हणाली, " हुसेन !"

" जी, सरकार !"

" कुछ नहीं, जलदी करो." ती म्हणत असतानाच तिच्या मनांत नाना प्रकारचे विचार येत होते. सुलभेला सांगायची ती आनंददायक बातमी तिला केव्हां एकदां सांगेन असं तिला झाल होतं म्हणूनच युनिव्हर्सिटीपासून बंजारा हिल्सपर्यंतचें अंतर तिला अनेक योजनाइतकं दूर वाटलं. सुलभेचा बंगला येताच ती हुसेनला म्हणाली, " थांबव इथंच. अन् गाडी घेऊन जा तूं ! अम्माजानला साग मी सुलुकडे आहे. येतेच थोड्या वेळांत !"

" जी सरकार !" हुसेननं पुन: मान हलविली.

ती चटकन गाडींतून उतरली. रोशनच्या गाडीचा आवाज ऐकतांच आळसावलेली सुलभा आपले विस्कटलेले केस सावरीत बाहेर आली. तिला पाहून रोशननं एकदम हात पसरून आनंदानं हांक मारली, 'सुलू !'

अन् यावर सुलूनं गंभीर चेहरा करून म्हटलं, ' जी सरकार !' हुसेन शोफरची इतक्या बेमालूमपणानं सुलूनं केलेली नक्कल पाहून रोशन मनमुरादपणान हंसत आंत आली अन् तिचे दोन्ही खांदे धरून विचारलं, " अब कैसा है तेरा मिजाज ?"

" बहोत अच्छा, शुक्रिया," रोशनच्या खांद्यावरून निसटलेल्या तिच्या रेशमी साडीचा पदर नीट करीत सुलभा म्हणाली, " पण आज आपली स्वारी फार आनंदात दिसत आहे. होय ना ?"

" उंऽऽहूं! आम्ही नाहीं सांगणार!"

" कां? मी आज कॉलेजला आले नाहीं म्हणून होय? असं काय? सांग ना लवकर!"

" सांगू?" रोशननं आपल्या कमानदार भुवया उंचावत विचारलं." पण काय काय देशील तूं मला? एक सिनेमा; प्लाझाला 'सॉंग ऑफ बर्नाडिट' लागलाय! बोल, दाखवशील कां?"

" हो, हो बाई! दाखवीन, झालं!"

" ऐक तर मग! आपली परीक्षा लांबली!"

" खरंच? अन् किती दिवस?" सुलूचे डोळे आनंदानें विस्फारले गेले.

" एक महिना! तुला केव्हा सांगेन असं मला झालं होतं. शेवटीं राह-वलंच नाही मला! अन् मग शेवटचा 'मिल्टन' बुडवून तुला मी सांगायला लवकर आले बघ!"

सुलभेच्या कोमेजून गेलेल्या चेहऱ्यावर हास्याच्या कळ्या उमलल्या. तिला आनंद झाला तो दोन गोष्टींनीं—एक तर परीक्षा लांबली म्हणून अन् दुसरं म्हणजे रोशनला आपल्याविषयीं वाटत असलेला गाढ स्नेह पाहून!....

" बंजारा हिल्स" हें हैद्राबादेंत कुबेराचें वसतिस्थान! बडे बडे डॉक्टर, सरकारी अधिकारी, फावड्यानें पैसा उपसणारे गुजराथी बनिये अन् हैद्राबादेच्या वैभवाचे नरशिरोमणि असे मोठमोठे नबाब लोक अशा लोकांचे राजशाही बंगले ताठ्यानं अन् थाटानं इथं उभे होते. तेथें येथील स्त्री पुरुषांच्या पायांना बागेतून हिंडतांना धरती मातेची जे कांहीं अप्रत्यक्ष स्पर्श होईल तेवढाच! गाडीशिवाय येथील लोकांचे पाऊल हालत नव्हतं!

सकाळपासून गॅरेजमधून निघणाऱ्या अन् शहराकडे जाणाऱ्या एकाहून एक सुंदर अन् डौलदार गाड्या पाहिल्या कीं वाटे....प्रत्येक बंगल्यांतील तरुणीप्रमाणेच यांच्यातहि सौंदर्याची अन् चपलतेची चुरस लागली आहे कीं काय....! हैद्राबादेंतील लोकवस्तीच्या साऱ्या साजशृंगाराचा मुकुट-मणी म्हणजेच ही अलका नगरी !

—अशा ह्या नगरींत पश्चिमेकडे तोंड करून उमे असलेले निळ्या रंगाचे दोन बंगले किंचित्काल बघितल्यावांचून कुणाचे पाऊल पुढें पडत नसे. अगदीं शेजारी शेजारी उमे असलेले ते दोन बंगले एका अतिशय श्रीमंत नबाबानं आपल्या दोन मुलींसाठीं बांधले होते. त्यांचा रंग, बांध-ण्याची पद्धत, पुढचा देखावा, समोरची बाग—सगळं सारखं होतं अगदीं ! त्याच्या दोन मुलींसाठीं बांधलेले हे बंगले ! पण दुर्दैवानें त्या दोघीहि कालवश झाल्या अन् नबाबसाहेबांनीं ते दोन्ही बंगले शोकातिशयानें विकून टाकले. त्यापैकीं एकाचे मालक एक मुसलमान एंजिनियर होते अन् पलि-कडचा बंगला एका हिंदु डॉक्टरनं घेतला होता. एंजिनियर सिराजउद्दिन अन् डॉ. पुरोहित ह्याचा स्नेह आज चार वर्षांपासूनचा होता.

× × ×

बरोबर चार वर्षांपूर्वीं .

बाहेरची घंटा वाजतांच पुढच्याच दालनांत असलेली सुलभा पुढें झालीं. शेजारच्या बंगल्यांतील नोकर अबदुल्ला तिला ‘कुर्निसात’ करून म्हणाला, ‘डॉक्टरसाहेब आहेत घरांत ?’ तेवढ्यात सुद्धचे ‘पपा’ बाहेर आले त्यांना अबदुल्लानं ‘आदाब’ केला अन् एंजिनियर साहेबांची मोठी मुलगी आजारी असल्याचं सांगितलं अन् शक्य तो लवकर येण्याची विनंति करून तो निघून गेला.

डॉक्टरसाहेब सिराजउद्दीनच्या बंगल्यावर गेले त्या वेळेस त्यांना सामोरा जाण्यासाठीं एकादा नोकर उभा नव्हता, तर स्वतः सिराजउद्दीनच बाहेर होते. त्याचं इतकं नम्र व अगत्यशील वागणं पाहून डॉक्टरांनासुद्धां वाटलं कीं हे मुसलमानी रक्त इतकं थंड कसं? त्यांच्या मुलीची प्रकृति तपासून व 'प्रिस्क्रिप्शन्' लिहून थोड्या वेळानं ते निघून गेले.

अन् ही गोष्ट सुलभेला कळतांच तिनं रोशनला भेटण्याचा विचार केला व तो अमलांत आणलाही!

रोशनच्या खोलींत तिच्या आईबरोबर सुलभा आली त्यावेळेस ती डोळे मिटून उजव्या कुशीवर निजली होती. तिचा उजवा हात तिच्या मस्तकाखालीं होता. मस्तकाच्या भारानं दाबला गेलेला तिचा बाहू अन् त्या दोहोंच्या भारानं दाबली गेलेली सावरीच्या कापशाची पांढरी शुभ्र उशी यांत अधिक गौरवर्ण कशाचा असा मनाला संभ्रम पडत होता. तिचे लालभडक ओठ तिनं घट्ट मिटून घेतल्यासारखे दिसत होते अन् जोरानं श्वास घेतांना तिच्या गळ्यापाशीं जी एक बारीक खळगी पडत होती ती फारच मनोरम दिसत होती.

"बेटी!" तिच्या आईनं प्रेमळपणें हांक मारली.

"अम्माजान—!" डोळे अर्धवट उघडीत रोशननं प्रत्युत्तर दिलं.

"बेटी वर बघ तर खर! एक नवीन मैत्रीण तुला पाहायला आली आहे!"

"कोण तुम्ही? कशाला तसदी घेतलींत माझ्यासाठीं!" कुशीवरून सरळ होत रोशन म्हणाली.

"छे: छे: तसदीची गोष्ट कसली? तुम्हांला लवकर बरं वाटो म्हणजे झालं" असं म्हणून तिच्या अंगावरचा रग सुलभेनं नीट केला.

"खरंच, ह्या दुखण्याचे आभारच मानले पाहिजेत मला! त्यामुळे तरी तुमच्याशी ओळख झाली. सुलभेचा हात रोशनच्या हातांत होता अन् रोशनच्या क्षीण नेत्रनिरांजनांत प्रेमलतेच्या स्निग्ध ज्योति तेवत होत्या.

अन् काय आश्चर्य! थोड्याच वेळात त्या मैत्रिणी बनल्या

बरोबर चार वर्षे झाली त्या गोष्टीला! तेव्हापासून रोशन अन् सुलभा ह्यांच्या घरातील स्नेह वाढत गेला होता. त्या तर अगदीं जिवाभावाच्या मैत्रिणी झाल्या होत्या. दोघीमध्यें कसलंहि गुपित नव्हत अन् म्हणूनच रोशननं मिल्टनचा तास बुडवून परीक्षा लांबल्याची बातमी सुलभेला सांगताच त्यांच्या पाठीमागच्या आतुरतेची कल्पना येऊन तिला विलक्षण आनद झाला .

"परीक्षा लांबली हे खरं ग, पण कशासाठीं लांबली हे तर सांग ना?"

"तें कोण जाणे बाई. मी नोटीस वाचली, पण त्यांत कारण नव्हतं दिलं जाऊं दे, आपल्याला काय—परीक्षा लांबली हे छान झालं! अन् तूं मला पिक्चर दाखवणार हे तर फार छान! मग कधीं नेणार तूं मला!" रोशननं लाडिकपणें विचारलं.

"तूं सांगशील तेव्हां—उद्यां—परवां केव्हांही!"

"बरं तर मग उद्यां कॉलेज सुटल्यावर ५ वाजतां! ठरलं हं! आतां जाऊं दे मला! अम्माजान माझी वाट पहात असेल. जाऊं मी?"

दुसरे दिवशीं युनिव्हर्सिटींत गेल्यावर सुलभेन ऑफिसमध्यें जाऊन सहज बोलतां बोलतां म्हणून परिक्षेची चौकशी केली पण परीक्षा लांबल्याची नोटीसच तिला नुसती वाचायला मिळाली. लायब्ररीयनकडून मात्र

खाजगी रीतीनें तिला कारण समजलं. अन् ते ऐकून तिला भयंकर संताप आला .. कॉलेजच्या विद्यार्थ्यांना ह्यापुढें रोज लष्करी शिक्षण देण्यांत येणार होतं—त्यापायीं जास्त वेळ खर्च होणार होता अन् म्हणून परीक्षा लांबल्या होत्या....त्यांना अशा प्रकारें देण्यांत येगाऱ्या लष्करी शिक्षणाचा उपयोग....ही कल्पना मनांत येतांच सुलभेच्या डोळ्यांसमोर संस्थानच्या सरहद्दीवर होणारीं अत्याचारीं दृश्यं दिसूं लागलीं.

दुसऱ्या तास नंतरच्या सुट्टींत ती लेडीज रूमच्या कोपऱ्यांत त्या खुर्चीवर एकटीच विचारमग्न स्थितीत बसली असतांना रोशन म्हणाली, "येणार ना आज चारच्या शोला?"

"अंऽऽ? काय म्हणालीस?"

"हे काय झोपेत आहेस कीं काय? मी विचारतें कीं दाखवणार ना आज पिक्चर आम्हाला?"

"पिक्चर? हो दाखवीन. पण परीक्षा लांबली म्हणून नाहीं तर तुझ्या केवळ कबूल केलं होतं म्हणून!"

"कां? परीक्षा लांबल्याचा तुला नाहीं कां आनंद झाला?"

"नाहीं!"

"नाहीं? कारण?"

"कारण त्या पाठीमागचा हेतू! रोशन मला सांगवत नाहीं. कसं सांगू मी? तुलासुद्धां हें कळल्यावर त्वेष येईल! कुणाहि सद्सद्विवेकबुद्धि असणाऱ्या माणसाला चीड आणणारीच गोष्ट आहे ती! इकडे ये अशी!"... रोशन तिच्याजवळ गेली अन् सुद्धनं हळूंच सांगितलेली ती गोष्ट ऐकून ती सुन्न झाली!

" असं करून काय मिळणार आहे त्यांना? आपल्या पायावर आपल्याच हातानं दगड पाडून घेण्यासारखं आहे हे !" उद्वेगानं रोशन म्हणाली.

ठण....ठण. ..ठण घंटा झाली अन् दोघीहि क्लासकडे वळल्या.

× × ×

यानंतर दोनचार दिवसांची गोष्ट ! बुधवार होता त्या दिवशीं ! शाळेंतून अवेळीच परत आलेल्या आपल्या बहिणीला पाहतांच उन्हांत केस वाळवीत असलेली रोशन म्हणाली, ' हें ग काय मेहेर, आज तूं लवकर कशी आलीस ?"

मेहेरनं आपल्या अंगाभोंवताली एक गिरकी मारली व आनन्दून ती म्हणाली, " दिदि, आज आम्हांला सुट्टी !' आज आपल्या संस्थानच्या स्वयंसेवकांची मोठी गिरवणूक निघणार आहे म्हणे !" रोशनच्या कमरेला विळखा घालीत ती पुढें म्हणाली, " दिदी, आतांशीं कशासाठीं ग ह्या मिरवणूकी निघताहेत नेहमी ?"

तिला कुरवाळीत रोशन म्हणली, " तूं लहान आहेस पोरी अजून ! जा, खेळ जा !"

घडलेल्या अन् घडत असणाऱ्या गोष्टी पाहून रोशन विचार करीत होती. आतां ह्यापुढें होणार तरी काय ? अशा विचित्र मन:स्थितींतच दिवस चालले होते. त्या दिवशीं शुक्रवार असल्यामुळे सगळ्यांना सुट्टी होती दुपारीं साडेबारा वाजतां रोशनच्या घरीं सगळीजण जेवत होतीं. मेहेरचे गमतीचे गोड बोल ऐकून सगळ्यांना हसूं येत होतं इतक्यांत रोशनच्या गड्यानं सुलभेनं बोलावल्याची वर्दी दिली. फ्रूट सॅलडचे कसेबसे चार चमचे तिनं घेतले व लवकर उठल्याबद्दल दिलगिरी दर्शवीत ती भरकन् सुलूकडे आली देखील ?

सुद्द त्यावेळेस तिच्या निजण्याच्या खोलींत पलंगावर पाटमोरी बसली होती. तिला पहाताच रोशन एकदम म्हणाली. "काय ग सुद्द? कशाला बोलावलस मला?"

सुलभा गप्पच होती! तिनं मान वळवून बघीतलं देखील नाहीं. हें पाहून रोशनला आश्चर्य वाटलं. पायांतल्या मखमली सपाता काढून टाकून चटकन् ती सुलभेजवळ पलंगावर बसली व मायेन तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाली, "काय झाल सुद्द?" तरीहि सुद्द गप्पच!

तिची हनुवटी वर उचलीत रोशन म्हणाली, "असं काय करतेस? सांग ना! माझ्या आनंदांत मी तुला भागीदारीण करावं अन् तुझ्या दुःखात मात्र तू मला दूर लोटावंस हीच का आपली मैत्री? माझ्यावर कां रागावलीस एवढी?"

"राग. कुणावर रागवावं हेंच मला समजत नाहीं रोशन!" असं म्हणून सुलभा रोशनच्या कुशीत मस्तक लपवून हुंदके देऊं लागली. सुलभेचे हुंदके ऐकून वत्सलाबाई तिची आई--पण तिथं आल्या अन् डोळे पुसू लागल्या. रोशन मात्र ह्या साऱ्या प्रकारानं पुरतीच गांगरून गेली. घाचरत ती म्हणाली. "चाची, काय प्रकार आहे? लवकर सांग ना!"

जवळच पडलेल्या लिफाफ्यातील तार सुलभेनं रोशनला वाचायला दिली. "प्रो. रमेशना दवाखान्यात दाखल केलंय. तावडतोब निघा." प्रश्नार्थक मुद्रेनं तिनं सुलभेकडे पाहिले अन् सुद्दनं जेव्हां तिला कसंबसं समजावून सांगितलं तेव्हां तिला धक्काच बसला!

× × ×

वरंगलच्या कॉलेजमध्यें प्रोफेसर असलेला सुलभेचा मोठा भाऊ रमेश ह्याला गुंडांच्या भयंकर दुखापती झाल्या होत्या. गुडघ्यावर लाठीचा तडाखा

इतक्या जोरानं बसला होता कीं तो पाय कायमचाच जायबंदी होतोय कीं काय अशी शंका उत्पन्न होत होती. व्यक्तिशः रमेशवर हल्ला झाला नव्हता, पण कांहीं संशयित लोकावर झालेल्या हल्ल्यांत तो सांपडला होता. आणखी सहा महिन्यांनीच टोरोंटो युनिव्हर्सिटीची पदवी परीक्षा देण्यासाठीं तो परदेशांत जाणार होता. त्याच्यावर ओढावलेला हा दुर्धर प्रसंग पाहून त्या मायालेकीचे धैर्य पार गळून गेलं होतं.

'पण ह्या प्रक्षोभाचं कारण तरी काय?' रोशन म्हणाली.

'रोशन सत्तेला शहाणपण अन् प्रक्षोभाला कारण कधींच नसतं'

'केवढे अत्याचार हे! ह्यांचा शेवट तरी काय होणार? तुझ्या भाभी तर दुःखानं अन् संकटानं खचून गेल्या असतील.' रोशनच्या डोळ्यांतून टपटप अश्रू ओघळूं लागले.

'नको रोशन, तूं वाईट वाटून घेऊं नकोस!'

'तुला तोंड दाखवायची ही लाज वाटते मला. सुद्ध!'

'वेडी कुठली! असं बोलू नकोस. ह्या गोष्टीला तूं किंवा इतर कोणी व्यक्तिशः असं जबाबदार नाहीं....पपा आज दुपारच्या प्लेननं वरंगलला जातील. रमेशला आणतां आलं तर येऊन वेतील, नाहींतर एकट्या बहिनीच येतील. अन् मग आम्ही सारीं....आम्ही सारीं पुण्याला जाऊं. रोशन लहानपणापासून राहिलेल्या गांवांतून संकटकाळीं दूर जातांना मनाला किती क्लेश होतात ग! आपलं घर, आपलं कॉलेज, आपल्या मैत्रिणी........आपले जिवाचे सारे लागेबांधे सोडून जाताना होणारं दुःख....'

सुलभेचे पुढचे शब्द रोशनला आलेल्या हुंदक्यांत तसेंच राहून गेले.

रोशन अन् सुलभा ? दोघींचे समाज वाटेल ती कृत्य करोत! पण त्यांच्यांतील मैत्री मात्र अखंड होती. तिला कशाचाच संपर्क लागत नव्हता. अन् म्हणूनच पुण्याला आल्यावर सुलभेनं रोशनला पत्र लिहिलं होतं अन् रोशननंहि तिला उलट उत्तर पाठवून आपला समाचार कळवला होता. यानंतर मात्र सुलभेनं दोन तीन पत्रं पाठवूनहि रोशनचं कांहींच पत्र नव्हतं. रोज पोस्टमनची वाट पहात व रोज निराशा पदरीं घेत तिनं अतिशय खिन्न मनःस्थितींत पंधरा दिवस काढले. पंधरा दिवसानंतर लखनौच्या पत्त्यावरून सुलभेला तिचं चिरवांछित पत्र मिळालं अन् तें वाचतांच मात्र ती सुन्न झाली.

× × ×

रोशननं लिहिलं होतं....

"मेहबूब मंझिल"
स्टेशन रोड,
लखनौ

प्रिय सुलू !

फार दिवसांनीं तुला पत्र लिहित आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं मला तुझी आठवण होत नव्हती ! तुझी आठवण रोज काय पण क्षणाक्षणाला होत होती मला ! अन् तरीहि मी तुला पत्र लिहिलं नाहीं कारण.... कारण मला होणारं दुःख इतकं मोठं आहे कीं तें डोळ्यावाटे उतरतं पण लेखणीवाटे मात्र उतरत नाहीं.

सुलू, लखनौला माझ्या चुलतभावाचं लग्न होतं. खरे म्हणजे प्रवास धोक्याचा म्हणून अब्बाजान नकोच म्हणत होते. पण अम्माजानच्या मनाचा हिरमोड त्यांना करतां आला नाहीं.

आम्हीं निघालों रात्रींच्याच गाडीनं ! साधारण तीन-चार तास कांहीं झाले नाहींत; रात्र बरीच झाली होती. अन् कुठल्याशा एका लहान स्टेशनवर सूटबूट घातलेले चार इसम आमच्या सेकंडच्या डब्यांत चढले. त्यांना पहातांच माझ्या छातींत कां कोण जाणे पण एकदम धस्स झालं अगदीं ! ते हिंदू होते कीं मुसलमान होते हें ओळखतां आलं नाहीं. गाडी सुरू झाल्यावर ते म्हणाले; " आम्हांला मदत हवी आहे. "

" कशासाठीं ? " अब्बाजाननीं विचारलं.

" सत्कार्य संघटनेसाठीं ! "

" ऊं ! मी कुठल्याच संघटनेला मदत करणार नाहीं ! " अब्बाजान ठासून म्हणाले.

" करणार नाहीं ? करावी लागेल ! " असं म्हणून त्यापैकीं एकानं शिटी वाजवली अन् इतका वेळ दारापाशीं असलेले दोघेजण यांच्या मदतीला आले.

क्षणभर काय होतंय तेही कळेना ! त्यांनीं अब्बाजानला खूप मारलं अन् त्यांची दृष्टी माझ्याकडे वळली. अब्बांनीं खूप प्रयत्न केला. पण त्या नराधमांनीं त्यांच्या रोखानं पाणी पिण्याचा ग्लास फेकून मारला. अन् घाबरून अब्बांना बिलगून उभ्या असलेल्या मेहेरच्या छातींत धाडकन् तो लागला. मेहेर खालीं पडली....आम्ही तिच्याजवळ आलों अन् तेवढ्या वेळांत त्या लोकांनीं आमच्याजवळचे सारं लुटून घेतलं....छातींत बसलेल्या तडाख्यानं मेहेरची हृदयक्रिया बंद पडली...

सुद्ध ! पैसा पुन्हां मिळवतां येईल....पण आमची गेलेली मेहेर ... ?

ती कधीं तरी परत येईल का ग ? सुद्ध, लहानपणापासून फूल पांखरासारखं आयुष्य गेलं माझं ! दुःख असं माहीतच नाहीं मला ! त्यामुळें

आतां बसलेल्या ह्या धक्क्यानं मी पुरतीच खचून गेलें आहे. क्षणोक्षणीं तुझी आठवण येते. सुद्ध तूं माझी बहीण का ग झाली नाहींस ? खरंच वेगळ्या जातीचे अन् वेगळ्या समाजाचे घटक असूनहि आपल्यांतली ही ओढ किती विलक्षण आहे नाहीं ? त्यात काहींतरी दिव्यत्वच आहे खास ! यापेक्षां जास्त काय लिहूं ?

अम्माजान शोकानं वेडी झालीय् नुसती ! अब्बांना काय करावं सुचत नाहीं. पोलिस तपास चालू आहे. आम्ही आमच्या काकांच्याकडे आहोंत सध्यां ! तुझी भेट होणं तर अशक्य आहे पण पत्र तरी पाठवशील ना ?

रमेश भाईची प्रकृति कशी आहे ? पपाना अन् चाचींना माझी आठवण करून दे. चाचींना मेहेरचा किती लळा होता ग ! त्यांना किती दुःख होईल हें वाचून ! पण नकोच आतां जास्ती—पुरे करते.

तुझीच

"शोभन"

× × ×

हैद्राबादेच्या कुबेरनगरींतील ते दोन निळे बंगले....! त्यांना तळहाता-एवढीं मोठीं कुलुपें लागलीं आहेत. बागेंत सगळीकडे पाला पाचोळा पडला आहे. अन् नोकरांनीं पाणी न घातल्यामुळें सुकलेल्या फुलझाडांवरचीं फुलं माना टाकून आपल दुःख व्यक्त करीत आहेत !

६

# गुलशान



" गुलशान ! प्यारी गुलशान ! ! "

हुसेनसागराच्या समोर एका प्रासादतुल्य बंगल्यांत कठड्याला रेलून गुलशान बागेतील पांढऱ्या शुभ्र कबुतरांच्या थव्याकडे पहात होती. गुलशान म्हणजे फूल ! अन् या नांवाची सार्थकता तिचा मुखचंद्र पूर्णपणे दाखवीत होता. तिच्या नेत्रांतली नीलकमलं, गालांवरचे गुलाब, दांतांच्या कुंदकळ्या अन् पारिजातकासारखी नाजुकता पाहूनच आज चार महिन्यांपूर्वी नबाबसाहेब अगदीं हवालदिल झाले होते.

" इस तरफ देख गुलशान, " असें म्हणत नबाबसाहेबांनीं तिची हनुवटी आपल्याकडे वळवली. अन् सुकुमार गुलशानच्या नेत्रद्वयांत एका सुस्वरूप अन् धिप्पाड तरुणाची मूर्ति सामावून गेली. पुरुषाचा पराक्रम अन् तरुणीचे सौंदर्य याचीं दोन प्रतीकेंच जणूं कांहीं ! भगवान् सहस्त्ररश्मीला सुद्धां हे नाजुकसें पारिजातकाचे फूल कोमेजून जाईल अशी भीति वाटली कीं काय कोण जाणे ! त्याचे किरणदूत हळूच चोरपावलांनीं पळून गेले अन् गुलशानच्या गालांवरचा रक्तिमा मात्र निरभ्र आकाशावर प्रतिबिंबित झाला. आपले निळसर डोळे त्या तरुणावर रोखून धरीत स्मित वदनाने गुलशान म्हणाली, " जी सरकार, फर्माइये आपका हुकूम ! "

जिना उतरून हळूं हळूं दोघेंहि बागेंतल्या कारंजापाशीं येऊन बसलीं अन् लबाड चंद्र त्यांचीं गोड प्रेम–कूजनं ऐकूं लागला.

कारंजांतून उडणाऱ्या पाण्याच्या फवाऱ्याकडे बघत नबाबसाहेब म्हणाले, “ गुलशन, आज चार महिने झाले ! बरोबर चार महिने ! ह्याच वेळेस तूं माझ्या आयुष्यांत आलीस. आठवतं तुला ? अन् ह्याच दिवशीं मी आपल्या या संस्थानच्या सेनासंघटनेचा एक पुढारी झालों. प्यारी, त्या दिवशीं सकाळीं झालेल्या सभेंत मी आपल्या संघटनेसाठी दहा हजार रुपयांची देणगी दिली. अम्माजान माझ्या खर्चिक स्वभावावर नाराजच झाली जरा. ..पण.. .पण संध्याकाळीं ह्याच वेळेस तुझ्या ह्या नेत्राकडे पाहिल्यावर मला वाटले कीं, हे दोन नीलमणी इतके मौल्यवान आहेत कीं, त्यावरून धनदौलतच काय, पण सारी जान कुर्बान करून टाकावी !....” नबाबसाहेब थोडा वेळ गुलशनच्या मेंदी लावलेल्या बोटांकडे पहात राहिले. आकाशांतून होणारी चंद्रकिरणांची बरसात, समोरच्या कारंजांतून उडणाऱ्या शीत जलांचे तुषारकण अन् प्रियकराच्या प्रणयी बोलांचें मादक सिंचन गुलशनला सुखवीत होतें. तिचीं लांबसडक बोटें आपल्या हातांनीं कुरवाळून ते म्हणाले, “ त्या वेळेस मला वाटलं अन् अजूनहि वाटतें कीं, सारं सार–हा बगला, हा बगीचा, ही दौलत–सारं झुगारून द्यावं अन् एकाद्या केतकीच्या वनांत सुवासानं मत्त होऊन न् तुझ्या सौंदर्यानें धुंद होऊन सारं आयुष्य कंठाव–मी अन् गुलशन ! गुलशन अन् मी ! पण या अल्ला ! मी पुरता बांधला गेलोय् आतां ! प्यारी, आपल्या सेनेचं पुढारीपण मी स्वीकारलं. आतां मला इथंच रहावं लागणार ! पण तूं लक्षांत ठेव–आपल्या सेनेसाठीं मी जितका त्याग करायला तयार आहे तितकाच माझ्या सखीच्या सुखासाठी करीन........”

असं म्हणून नबाबसाहेब हळूंच खालीं वाकले अन् चंद्र ढगाआड लपला.

रात्रीचं रुचकर अन् स्वादिष्ट जेवण झाल्यावर छप्परी पलंगावर परांच्या शय्येवर गुलशनचा देह विसांवला. दासीने येऊन तिच्या पलंगाची गुलाबी मच्छरदाणी खालीं सोडली. उशाशीं जाईच्या कळ्या ठेवल्या अन् खिडकीचा जाळीचा पडदा किंचित्सा बाजूला सरकविला. मऊ मऊ सॅटिनच्या दुलईंत स्वतःला लपेटून घेत गुलशन कुशीवर वळली. स्वयंसेवक-संघटनेच्या इतर पुढाऱ्यांशीं वादविवाद करीत नबाबसाहेब बाहेरच्या दिवाणखान्यांत बसले होते.

गुलशनच्या नयनांवर निद्रादेवीने केव्हा आपले हात फिरविले कुणास ठाऊक! पण ती ज्या वेळेस जागी झाली त्यावेळेस तिच्या नयनांवाटे अश्रू ओघळून आले होते अन् ओठातुन हळूंच अक्षरे बाहेर पडली, "सावळ्या! सावळ्या!!!"

बाहेरच्या खुर्च्यांचा आवाज झाला. विजेचा पंखा बंद केला गेला अन् 'आदाबे अर्जच्या' गडबडींतच नबाबसाहेब पायांत मखमली जोडे चढवीत शयनमंदिराकडे आले. झोपण्याच्या वेळचे कपडे चढवून ते गुलशनच्या शय्येकडे आले. निजण्याच्या अगोदर तिच्याशीं दोन शब्द बोलण्याची त्यांची इच्छा होती. पण गुलशनने झोपेचे इतकें बेमालूम सोंग केले कीं, नबाबसाहेब क्षणांतच आपल्या पलंगाकडे परतले.

× × ×

रात्रीचे दोन वाजले तरीहि गुलशनला झोंप आली नाहीं. तिच्या अंगाखालची ती परांची गादी अन् देहाला लपटलेली ती मऊ मऊ रेशमी दुलई........

........मराठवाड्यांतल्या एका खोपटांतल्या अंधारांत अंगाखालीं कांबळे अंथरून अन् थंडीपासून रक्षण करण्याकरितां सतरा ठिकाणीं ठिगळे लावलेली घोंगडी पांघरून निजणारी गुलाब सांवळ्याचा संसार सुखाने करीत असतांनाच चार महिन्यांपूर्वी तिला जबरदस्तीने 'गुलशन' बनविण्यांत आले होते.

गुलाबचा प्रेमळ पति सावळ्या फक्त दोन शेतांचा मालक होता. पण त्याची कष्टाळू अन् समाधानी वृत्ति अन् गुलाबची नीटनेटका संसार करण्याची हौस यामुळे तीं दोघें सुखात होतीं. गुलाब खरे पहातां शेतकऱ्याची स्त्री. पण इतर स्त्रियांप्रमाणे ती कधीहि शेतांत गेली नाहीं किंवा लुगड्याचा काचा मारून शेतांत राबलीहि नाहीं. सावळ्याला लोक हंसत, "अरे, काय पण परी आणलिया रे करून! घरामंदी ठिवून त्या बाईलची काय पूजा करणार व्हय देवावाणी? आपुन बसतों बैलावाणी काम करीत अन् ती आवा बसतीया घरामंदी कवाड लावूनशानी!"

पण सावळ्याला माहीत होते की, जे असे बोलत आहेत तेच त्याच्या गुलाबसाठीं टपून बसलेत. मग इतर मुसलमान गुंडांची काय कथा? शेतांतल्या कामांत जरी त्याला गुलाबची मदत होत नव्हती तरी त्याचे घर, त्यांचे जेवणखाण अन् त्याचे सुखोपभोग यांमध्यें ती त्याला इतका आनंद देत असे कीं, सावळ्याला वाटे, आपल्या साऱ्या दोस्तांपेक्षां आपण फार सुखी आहोंत. अन् ते खरेहि होते.

पण—? अशा सुखसमाधानांत न्हात असतांनाच गेल्या वर्षापासून सावळ्या अन् गुलाब यांच्यांत प्रेमळ खटके उडूं लागले. ऑगस्ट महिन्यांत गोऱ्या लोकांची सत्ता संपुष्टात आली. ही बातमी सावळ्याला त्याच्या एका शेजाऱ्याने सांगितली. अन् थोड्याच दिवसांत मुसलमान अधिकाऱ्यांचा,

स्वयंसेवकांचा अन् गुंडांचा साऱ्या खेडूत जनतेला फार त्रास होऊं लागला. रोज संध्याकाळीं कामावरून घरीं परत आल्यावर सावळ्या दिवस-भर ऐकलेले छळवादी वृत्तांत गुलाबला ऐकवीत असे. गुलाबचे माहेर कोल्हापूरकडले! तिथें माहेरीं जावें अशी सावळ्याची फार इच्छा होती. पण सावळ्याला टाकून त्याच्या खाण्यापिण्याचे हाल करून गुलाबला माहेरीं जाववेना. रोज संध्याकाळीं असे खटके उडत अन् रात्रीचे जेवण अबोल्यांतच होई. पण जेवण झाल्यावर गुलाबने भरून आणून दिलेली चिलीम ओढतांना सावळ्याचा राग कुठल्या कुठे पळून जाई.

अशा स्थितींत सहा महिने गेले. आतांपर्यंत संस्थानच्या स्वयंसेवक म्हणविणाऱ्या गुंडांनीं अनेक खेडीं उध्वस्त केलीं; धनदौलत लुटली, स्त्रियांची अब्रू घेतली अन् आबालवृद्धाचे नाहक बळी घेतले.

अन् एका रात्रीं—एका काळ रात्रीं सावळ्याच्या गांवावर गुंडांची टोळ-धाड आली; सारे गांव लुटले गेले. सावळ्याच्या झोंपडींत मातीच्या गाड-ग्यांच्या उतरंडींत लपून ठेवलेली सावळ्याची कमाई लुटली गेली, एवढेंच काय, पण त्याच्या सुखाचा ठेवा अन् हृदयाचा विसांवा असलेली त्याची कारभारीण—तिला त्याच्यापासून त्याच्या डोळ्यादेखत दूर ओढून नेली. गणू महाराची बहीण, धोंडीबा शेतकऱ्याची मुलगी, सावळ्याची पत्नी अन् त्यांच्या शेजाऱ्याकडे नुकतीच सोलापुराहून आलेली पाहुणी—त्यांच्या देखत गुंडांनीं ओढून नेल्या. त्यांच्या गोठ्यांतल्या गाई दावें सोडून पळविण्यांत आल्या. मानवी जीव आणि पशु यांत फरक असा नाहींच जणूं कांहीं, असें त्यांचीं कृत्यें दाखवीत होतीं. या अमानुष कृत्यांचा प्रतिकार केला तर जीवावरच बेतायचें! सावळ्या ज्यावेळेस प्रतिकार करूं लागला त्या वेळेस

चांगला पाजळलेला एक चमकदार सुरा त्याच्या हातापायांच्या बोटांवर खाडकन मारण्यांत आला. गणूच्या डोळ्यांत तिखट भरण्यांत आले अन् धोंडीबाच्या पोटांत खुपसलेला सुरा बाहेर येतांना रक्ताची भली मोठी चिळकांडी घेऊन बाहेर आला....गुलाबला इथपर्यंत शुद्ध होती. शक्य तेवढा प्रतिकार करीत सावळ्याच्या नांवानें आक्रोश करीत असतांनाच तिने हे सारे पाशवी प्रकार पाहिले अन् भोवळ येऊन ती खालीं पडली. ज्यावेळेस ती शुद्धीवर आली त्यावेळेस तिच्या सभोंवतीं काळच्यापैकीं चार गुंड होते. एक खूप श्रीमंती थाटाच्या बंगल्यांतील बाहेरच्या दालनांत अस्ताव्यस्त दशेंत एका काश्मीरी गालीच्यावर ती पडलेली होती अन् समोर एक दैदिप्यमान मूर्ति आपल्या नेत्रांनीं तिच्या सौंदर्याचें प्राशन करीत उभी होती........

दुःखावेगानें पुन्हां गुलशनच्या तोंडांतून अस्पष्ट शब्द आले. "सावळ्या! सावळ्या!"

तोंच नवाबसाहेबांचा पलंग करकरला अन् त्यांनीं विचारलें, "क्या, अबतक तुझे निंद नही आयी, गुलशन?"

"नाहीं, आतांच जागी झाले मी. पण सरकार अजून जागे कसे!"

"झोंपच येईना मला. खरे सांगू गुलशन! आपल्या संस्थानचे दुर्दैवी भवितव्य माझ्या डोळ्यांसमोर दिसतंय् सारखं. वाटतं कीं आपण करतो ती गोष्ट योग्य आहे कीं नाहीं? अन् मग काळजी वाटायला लागते. पण........जाऊं दे प्यारी, झोप तूं आतां शांतपणानें. डरनेका क्या काम हैं? हम तो आजादीके लिये हमारे खून देनेके लिये भी तय्यार हैं........"

× × ×

सप्टेंबर महिन्याची तेरा तारीख उजाडली अन् पहांटे साडेचार वाजतां संस्थानवर संघराज्याचा हल्ला झाला. सैन्याचे पुढारी गडबडून गेले स्वयं-सेवक सेनाहि सैन्याच्या मदतीला पाठविण्यांत संस्थान कसूर करीत नव्हतें. स्वातंत्र्याच्या लढ्यांत रक्त सांडायला प्रत्येकजण जणूं अहमहमिकेनें पुढें होत होता. "हमारे स्टेटके लिये खून कीं जरूरत हैं. आईये." अशा आव्हानाच्या घोषणा रस्तोरस्तीं होत होत्या. पण गुलशनला कशाचीच बातमी नव्हती. मोत्यांच्या दाण्यांच्या चाऱ्यावर रहाणाऱ्या राजहंसाला समुद्रांत पेटलेल्या वडवानलाची काय कल्पना असणार?

नबाबसाहेब सबंध दिवस बाहेरच होते. अन् रात्रीं परत आल्यानंतर ते जेवले तेहि अगदीं विमनस्क स्थितींत! विडा देतांना गुलशननें विचारलें, "मेरी सेवामें कुछ कसूर तो नहीं हो गया सरकार?"

"नहीं गुलशन, कसूरकी कोई बात नहीं" असे म्हणून त्यांनीं तिला सांगितलें कीं त्यांच्या संस्थानवर त्यांच्या 'दुश्मन'चा अचानक हल्ला झालाय्—सैन्य अन् स्वयंसेवक मुंगीसारखे चिरडले जात आहेत. अन् त्यांची माघार होत आहे....गुलशनचे नेत्र क्षणभर आनंदानें चमकून गेले!

एक—दोन—तीन—पांचवा दिवस उजाडला. मुख्य मंत्र्यांचें शरणागतीचें भाषण झालें अन् मग मात्र नबाबसाहेब पुरतेच गडबडून गेले. त्या दिवशीं दुपारपासून तिजोरीच्या खोलींत गुलशननें त्यांना बऱ्याच वेळां पाहिलें होतें. आणि त्यांच्या एकंदर वागण्यावरून तिनें ओळखलें कीं, ते सारे जडजवाहीर घेऊन कुठें तरी जाण्याच्या तयारींत आहेत.

"कुठें जाणार सरकार?" तिनें विचारलें.

"कां? तुला त्याच्याशीं काय कर्तव्य? तूं कोण मला विचारणार?" नवाबसाहेबांच्या रागाचा पारा एकदम चढला. पण तितक्याच शांतपणानें ती म्हणाली, "मी कोण म्हणून विचारतां? मी—तुमची गुलशन! चार महिने ह्या बंगल्याच्या पिंजऱ्यांत कोंडलेली अन् अगतिकपणानें तुमच्याजवळ प्रेमाचे नाटक करणारी तुमची गुलशन!"

"हें बघ गुलशन, मला आता वेळ नाहीं. हा फारच बिकट प्रसंग आहे. हिंदी शिपाई मला पकडून न्यायला येतच असतील. त्याच्या आंत मला विमानानं पाकिस्थानात पोहोचलेच पाहिजे. तिथेच मला आसरा मिळेल."

"मग माझी वाट काय?"

"तुझी वाट तुला मोकळी आहे. मी काय जन्मभर पोसण्यासाठीं तुला घरांत घेतली होती होय? चल, हें घे तुझ्या चार महिन्यांच्या सेवेचें बक्षीस!" असें म्हणून त्यानीं एक मौल्यवान हिऱ्यांचा कंठा तिच्या अंगावर फेकला. त्याच्याकडे तुच्छतेनें पहात थरथर कांपत ती म्हणाली, "चार महिन्यांपूर्वी माझ्या नवऱ्यापासून मला ओढून आणलेस, तो तूंच ना! माझ्यावरून 'जान कुर्बान' करण्याच्या गोष्टी केल्यास—आठ दिवसांपूर्वी प्रेमाच्या गोड गोष्टी करणारा तूं आज मला रस्ता दाखवीत आहेस. चार महिने मुसलमानाच्या घरांत राहिलें मी! आतां मला कोण आश्रय देणार? दुष्टा, चार महिने मनांतून नाराजीनेंच का होईना, पण तुझी प्रत्येक इच्छा पुरविली मी! तूं मला आतां वाट दाखवितोस ना? देहानें तर मी भ्रष्ट झालें खरी, पण तुझ्या रूपांत माझ्या सावळ्याचें रूप पाहाण्याचें मी फार मोठे पाप केले."

वेषांतर करून बाहेर येत असताना नवाबसाहेब म्हणाले, "तुझी गरज नाहीं मला आतां! एवढ्या संबंध संस्थानवर—माझ्या जीवितावर

इतका मोठा प्रसंग आला असतांना तुझा विचार करीत बसायला मला वेळ नाहीं .... ..ड्रायव्हर चलो, जलदी करो."

मोटार भुरकन निघून गेली अन् एवढ्या मोठ्या बंगल्यांत एकटी गुलशनच राहिली. नोकर–चाकर तर रात्रींच पळून गेले होते.

गुलशनच्या गालांवर ओघळून येणारे अश्रू टप टप तिच्या मांडीवर पडत होते. तिच्या पायांपाशीं सगळ्या विस्कटलेल्या ट्रंका अन तो हिऱ्याचा कंठा पडला होता. समोरच्या आरशांतल्या आपल्या प्रतिबिंबा-कडे तिनें पाहिलें अन् रडतां रडता ती एकदम हसूं लागली. "सावळ्या, आतां सगळी भीति गेली. मला आता तुझ्याकडे येऊं देशील ना? हो म्हण, हो म्हण ना ! तुझीं बोटें या दुष्टाने तोडून टाकलीं, तुझें कोण करील आतां सारें? तुझी सेवा करायला मला येऊं देशील ना? ही बघ मी तुझ्यासाठीं धांवत यायला तयार आहे अगदीं !"

असे म्हणून तिने गळ्यातला मोत्याचा कंठा तोडून टाकला. हातांतलीं सोन्याचीं काकणें काढून टाकलीं. कानांतलीं कर्णभूषणें दूर भिरकावून दिलीं अन् बंगल्यांतून धांवतच ती बाहेर पडली.

× × ×

शहरांत "जय हिंद"च्या घोषणा होत होत्या. भाषणें होत होतीं. मोठमोठ्या उत्साही मिरवणूकी निघत होत्या अन् त्यांतूनच कशीबशी वाट काढीत सावळ्याच्या नांवाने कंठशोष करीत एक स्त्री वेड्यासारखी धांवत सुटली होती .. .

—"ध्रुव" नोव्हेंबर १९४८

७

# अलकेचा वाढदिवस



सुशीलेनं घड्याळाकडे पाहिलं—नऊ वाजून गेले होते. तिनं लगबगीनं शेगडींतल्या विस्तवांत आणखी कोळसे घातले अन् चट्‌चट् डाळ, तांदूळ, भाजी घेऊन कुकर लावला. नऊ वाजून गेले होते....आज अलकेचा वाढदिवस होता. तिला आज पाचवं वर्ष लागलं होतं. तिला अतिशय आवडणारी बासुंदी आज सुशीला करणार होती. पण अजून दुधवाल्यानं दूध आणलं नव्हतं. सुशीलेनं पुन्हां एकदा घड्याळाकडे पाहिलं....नऊ वाजून दहा मिनिट झालीं होतीं....प्रभाकरराव थोडासा फराळ करून ऑफिसला गेले होते अन् एक वाजतां अलकेच्या वाढदिवसाचं चमचमीत जेवण जेवायला येणार होते....आज सोमवार होता. काल रविवार असल्यामुळें पुष्कळशीं दुकानं बंद होतीं. सुशीलेनं विचार केला कीं कुकर तयार होण्याच्या आंत तिला दुकानांत जाऊन अलकेला द्यायचं बक्षीस आणतां आलं असतं !

तिनं पटकन् साडी बदलली अन् आरशांत पाहून केस नीटनीटके केले नि हळूच पुढच्या खोलींत डोकावून पाहिलं. खुर्चीवर बसलेला अरुण हातांत फूटपट्टी घेऊन अलकेला गुरकावून म्हणत होता, "सांग! कां अभ्यास केला नाहींस आज? अं? हात पुढें कर—कर पुढें!"

अन् यावर बोबड्या अलकेनं समर्थन केलं, "दादा, आज मला मालायचं नाहीं अं! बघ! आज माज्या बालदिवश आहे—छमजलाच?"

यावर अरुण खुदकन् हंसला अन् फूटपट्टी फेकून देऊन अलकेचा हात धरीत म्हणाला, "अलका, चल आपण आईला विचारूं कीं...."

"काय विचारूं आम्हांला?" मधल्या खोलींतून पुढे येत सुशीलेनं कौतुकानं विचारलं.

पण........? काय विचारायचं होतं ते आईला पहांताच तो विसरून गेला! कारण आईनं बाहेर जाण्याची तयारी केली होती. धांवतच तो आईजवळ गेला अन् तिचा पदर धरीत लाडिकपणानं म्हणाला, "आई, तूं बाहेर चाललीस ना? मी येऊं?"

त्याचं अनुकरण करीत दुडूदुडू धावत येत अलकेनं आईच्या पायांना विळखा घालीत म्हटलं, "आई, मी पन् येऊं का ग?"

"कुठं रे बाबानो? कुठं चाललें मी?"

"हंऽऽ! तूं भाजी मार्केटांत चालली आहेस आई, मला पेरू पाहिजे. येऊं कां ग मी?"

"आई, मला दालिंब पायजे...."

"ओऽऽ हो! पेरू अन् डाळिंब!"

"हो, लाल लाल भलक दाने निघतात ना—ते पायजे!"

दोघांना जवळ घेत सुशीला म्हणाली, "हें पहा अरुण, मी किनई जराशी दवाखान्यांत जाऊन येते."

"दवाखान्यांत कशाला ग?" अरुणनं चौकशी केली.

"अरे हा बघ, माझा पाय अस्सा दुखतोय कीं...." सुशीलेनं उगीच 'हाऽऽयू' असा अस्फुट उद्गार काढला!

दोन्ही बालमनांना तें खरं वाटलं!

" आई लवकर येईल ना ग?" अलकेनं काकुळतीनं विचारलं.

" हो, बेटा, लवकर येतें हं, आत्ता! आपला हा जवळचा दवाखाना आहे ना बागेपासचा-तिथंच जाते ..अन् येताना अरुणला पेरू, अलकेला डाळिंब ...सगळं सगळं आणतें. जाऊं मी आता? हे पहा, रखमा बसली आहे बाहेर-आलेच हं मी!" असं म्हणत तिनं चपला घातल्या अन् पिशवी अन् छत्री घेऊन ती बाहेर पडली.

सुशीला दृष्टीच्या टप्यांत येईनाशी झाल्यावर अलका म्हणाली, " दादा, आईचा पाय दुखतो डाकतर औछद लावतील ना रे?"

" हो ना! दुखेल नाहीं ग मग तो?"

अरुण अन् अलका घरांत येऊन पुन्हा खेळू लागलीं. रोज सारखा त्रास देणारा अरुण आज अलकेशीं अगदी गोडीगुलाबीनं खेळत होता. कारण आज तिचा वाढदिवस होता म्हणूनच सुशीला खेळण्याच्या दुकानांत नाना तऱ्हेचीं खेळणीं पहाण्यांत रंगून गेली होती....तिनं कांहीं सुबक खेळण्यांची निवड केली. पण तिला अक्षरं शिकविणारे चित्राचे रंगीत ठोकळे मात्र तिथं मिळाले नाहींत. अलकेला आतां पांचवं वर्ष लागलं होतं अन् तिला मुळाक्षरं शिकविण्याचा सुशीलेचा विचार होता. त्यामुळें ते रंगीत ठोकळे न मिळाल्यामुळें ती जरा खट्टू झाली. आणखी साधारण पंधरा मिनिटांच्या रस्त्यावर एक दुकान होतं.... तिनं विचार केला कीं आजच्या दिवसाचं महत्त्व आहे. थोडा उशीर झाला तरी रखमा घरीं आहेच. ती मुलांच्याकडे पाहील....झपझप पावलं टाकीत ती दुकानाबाहेर पडली....

....इकडे रखमा बसून बसून कंटाळली. तिची बाकीची घरचीं कामं राहिलीं होती. तिनं बराच वेळ वाट पाहिली. अन् शेवटीं शेजारच्या वकी-लीणबाईंच्याकडे निरोप ठेवून ती निघून गेली.

आईची वाट पाहून कंटाळलेला अरुण म्हणाला, "अलका, आई कशी आली नाहीग अजून?"

"दादा! माला भूक लागली—आई कदी येईल ले?"

"थांब आपण गम्मत करूं! मला माहित आहे दवाखाना! आपण कधी कधी बागेत जातों ना? त्या बागेतून त्या पांढरे शुभ्र कपडे घात-लेल्या बायका दिसतात नाही? तिथं आहे तो दवाखाना—मी तुला हात धरून नेतों, चल आपण जाऊं या! आईला किती किती गम्मत वाटेल नाही!"

"खलंच! पन येते. माजा हात धलशील ना पन!

अरुणनं मोठेपणाचा आव आणून पुढच दार लावलं. पाय उंच करून मधली आडवी कडी घातली अन् अलकेचा हात धरून तो फुटपाथवरून दवान्याखाच्या रोखानं चालूं लागला.

दवाखान्यांत आईनं आपल्याला पाहिल्यावर तिला किती आनंद वाटेल हे अरुणाची स्वारी आजमावीत होती. अन् दवाखान्यांत आईनं डाळिंब आणलं असेल कीं नाहीं ह्या प्रश्नावर अलकेचं बालमन विचार करीत होतं.

साधारण दोन फर्लांगाचा रस्ता दोघंहि एकमेकांचा हात धरून चालत गेलीं. बागेजवळील दवाखान्यांपुढें दोन—तीन मोटारी नी सहा टांगे अन् जाणाऱ्या येणाऱ्यांची वर्दळ दिसली.

दवाखान्याच्या मोठ्या फाटकांतून ती दोघं बिचकतच आंत शिरलीं. आंत शिरतां शिरतां अलका म्हणाली, " दादा, मला भीति वाटते!"

अरुणहि किंचित् घाबरला. औषधांच्या बाटल्या नेणारे ते लोक, औषधांचा येणारा तो उग्र दर्प, लगबगीन चालणाऱ्या त्या नर्सेस्, अन् दवाखान्यांतल्या पेशन्टस्चं ओरडणं अन् किंचाळणं हे सारं पहातांच अरुणची स्वारी गडबडली! तेवढ्यांत तिथले एक सर्जन वैद्यकाच्या कांहीं विद्यार्थ्यांना घेऊन तिथून चालले होते. त्यांचं लक्ष ह्या चिमुकल्या जोडीकडे जातांच त्यांना मोठं कुतूहल वाटलं. त्यांच्याजवळ जात डॉक्टरसाहेब म्हणाले, " बाळांनो, काय पाहिजे तुम्हांला?"

लांबलचक पांढरा शुभ्र कोट घातलेली त्यांची ती भव्य मूर्ति पहातांच अरुण घाबरला. त्याच्या तोंडातून शद्बच बाहेर येईना. कसंबसं वर पहात तो म्हणाला, " आई पाहिजे—आमची आई!"

" तुमची आई? ती इथं दवाखान्यांत पेशन्ट आहे की काय?" त्याला अन् अलकेला जवळ घेत त्यांनी पुन्हा विचारलं.

अरुणला काय बोलावं हे समजेना म्हणून त्यानं होकारार्थी मान हलवली.

ते पाहून डॉक्टरसाहेबांनी कोपऱ्यांतल्या एका स्टुलावरची बेल वाजविली. क्षणार्धात एक पांढरा झगा घातलेली अन् डोक्याला पांढरा रुमाल बांधलेली एक नर्स पायांतल्या सँडल्सचा " किट किट " असा आवाज करीत तिथ आली.

डॉक्टरांनी इंग्रजींत तिला सगळी हकीगत सांगितली अन् ते पुढें म्हणाले, " जा, बायकांच्या सगळ्या वॉर्डांतून ह्यांना घेऊन जा अन् ह्यांच्या आईकडे पोंचवा. आईसाठीं रडवेले झालेत गुलाम!"

डॉक्टरांवरची दृष्टि अरुण अन् अलकेवर स्थिरावत ती खिश्चन नर्स एकदम म्हणाली, " ओ! हाऊ वंडरफुल ! हाऊ स्वीट !"

त्यांना स्त्रियांच्या वॉर्डाकडे नेत असतांना तिनं विचारलं, " तुमच्या आईचं नांव काय ? "

" आईचं नांव ? " केवळ सहा वर्षांच्या अरुणाला आईचं नांव काय असावं हा मोठाच प्रश्न पडला !

" बरं जाऊं दे. ती कशी आहे हे तर तू ओळखशीलच की !"

तिनं त्यांना बायकांच्या वॉर्डमधल्या निरनिराळ्या सेक्शनमधून नेलं.

रोगानं पीडलेल्या, दुःखानं गाजलेल्या, कण्हणाऱ्या, कुंथणाऱ्या, किंकाळणाऱ्या त्या स्त्रियांना पहातांच अरुण अतिशय घाबरला. अलकेला तर उमजच पडेना !

शेवटीं सगळ्या सेक्शनमधून ती सूतिकाविभागांत आली अन् प्रत्येक पलंगावरची स्त्री दाखवीत म्हणाली " इथं आली कां तुमची आई ? "

पलंगावर झोपलेल्या त्या बायका अन् त्यांच्या समोरच्या पाळण्यांतलीं चिमुकलीं ' बाळं ' पाहून अरुणनं घाबरून विचारलं " कुठं आहे आई माझी ?"

" म्हणजे काय ? तुझी आई कशासाठीं आली होती इथं ?"

" तिचा पाय दुखत होता. " गुदमरलेल्या आवाजांत उत्तर आलं.

नर्सनं पुन्हां त्यांना ऑपरेशन्स् विभागांत नेलं अन् सगळ्या बायका दाखवल्या. पण तिथहि आपली आई नाहीं हें कळतांच अरुणनं एकदम गळा काढला अन् अलकेन त्यांत आपला सूर मिळवला ! !

" ह्या मुलाची आई नाहीं इथं डॉक्टर ! "

" आई नाहीं ? म्हणजे ?"

तीव्रपणानं उद्गारलेल्या डॉक्टरसाहेबांच्या ह्या शब्दांनीं अरुणनं खूप मोठ्यानं रडायला सुरवात केली. अकरा वाजून गेले होते. सकाळच्या एक दुधाशिवाय त्यांनीं कांहीं घेतलं नव्हतं. त्याच्या मनाला अतिशय शीण झाला होता. सारीं माणसं—सारा दवाखाना आपल्याभोंवती गरगर फिरतोय् असं त्याला वाट अन् क्षणार्धांत भोंवळ येऊन तो खालीं पडला.

"अरे! अरे!" असं म्हणत नर्स पटकन् खालीं वाकली व तिनं अरुणला दोन्ही हातांवर उचलून घेतलं. डॉक्टरसाहेबांनीं स्वतः अलकेला घेतलं व ते त्यांच्या खास खोलीकडे त्यांना घेऊन आले.

डॉक्टरांच्या उपचारानंतर शुद्धीवर आल्यावर अरुणनं पुन्हा किंकाळी फोडली, "आई! बाबा! माझी आई!"

त्याला गोंजारींत डॉक्टर म्हणाले, "बाळ कुणाचा मुलगा आहेस तूं? तुझ्या वडिलांचं नांव काय?"

घडलेल्या सगळ्या प्रकारान अरुणची स्मरणशक्ति अन् विचारशक्ति इतकी बधीर झाली होती की त्याला कांहीं कांहीं आठवेना!

मुंसमुसणाऱ्या अलकेचा हात धरीत नर्सनं विचारलं "तूं सांग! तुला आई पाहिजे ना? मग सांग! तुझ्या वडिलांचं नाव काय?"

हुंदके आवरीत अलका म्हणाली "बाबा"

"तुझ्या भावाचं?"

"दादा!"

"अन् तुझं!"

"अलका!"

"बरं, आतां तुमच आडनांव सांग?"

प्रश्न न समजल्यामुळें अलकेनं पुन्हा रडायला सुरवात केली.

"हं! हं! रडूं नकोस. रडायच नाही असं. अलका तुझी आई कशी आहे ग?"

"छान आहे माजी आई! गोळी गोळी पान!"

ह्या उत्तरानं नर्सनं अन् डॉक्टरानीं एकमेकाकडे पाहिलं त्या परिस्थितींतहि त्यांना हसू आल्यावाचून राहीलं नाही.

डॉक्टरानी थोडावेळ विचार केला. अरुणला कपभर दूध दिलं अन् अलकेला बिस्किट अन् मोसंबी दिली व लगेच पोलीसस्टेशनवर दोन मुलांच्या आगमनाची वार्ता कळवली.

डॉक्टरसाहेबाच्या खोलीतील कॉटवर पडलेल्या अरुणनं अलकेला जवळ बसून घेतलं, थकलेली अलका थोड्याच वेळात अरुणच्या शेजारी त्याच्या गळ्यांत हात टाकून झोपी गेली

.... ...इकडे चित्राचे ठोकळे मिळाल्याच्या आनंदांत सुशीला दुकानांतून हंसतमुखानं बाहेर पडली. इच्छित वस्तु मिळाल्याचा आनंद. मुलाची काळजी अन् स्वैपाकाला झालेला उशीर ह्या साऱ्या गोष्टीचा तिच्या मनांत अगदीं गोंधळ उडाला होता. सव्वा नऊला ती घरांतून निघाली होती, आता सव्वा अकरा झाले होते. अरुण अन अलका कटाळून गेलीं असतील ह्या कल्पनेनं तिची पावलं झपझप पडत होतीं. जातां जातां फळवाल्याकडून तिनं पेरू अन् डाळिंब घेतलीं अन् पुन्हां ती भरभर चालू लागली.

बागेपाशी येताच बागेच फाटक उघडं असलेलं तिला दिसलं, तिला जरा आश्चर्य वाटलं. तशीच ती पुढें आली .तो पुढच्या दाराला कडी! तिचं आश्चर्य एकदम दुणावलं. 'अरुण अन् अलका गेली कुठं?" हातातलं सामान तसंच पुढच्या खोलींत टाकून देऊन ती शेजारच्या

वकीलीणबाईकडे आली. चमचमीत जेवणानंतरच्या मस्त सुस्तींत त्या 'प्रसाद' मासिक वाचित कोचावर पहुडल्या होत्या. रखमानं नोकरांतर्फे कळवलेल्या निरोपाची त्यांना दखलहि नव्हती.

सुशीलेनं विचारलं? "अरुण अन् अलका आली आहे कां खेळायला?"

"छे, बाई! अरुण अन् अलकेशी खेळायला इथं आहे कोण? माझा सुनील तर बालविकासात केव्हांच गेला!"

हे ऐकतांच सुशीला घाबरली. ह्या घराशिवाय तिची मुलं कुठहि खेळायला जात नसत. तिच्या मनात नाहीं नाही ते विचार येऊं लागले. खचलेल्या स्वरांत ती म्हणाली, "फोन घेऊ का मी जरा?"

मासिकातली दृष्टि वर न करता वकीलीणबाईंनीं हुंकार दिला.

सुशीलेनं प्रभाकररावाना फोन करून घरी बोलावल ..

तिच्या डोळयांतून अश्रुधारा वाहू लागल्या. तिचं हृदय धडधडत होत अन् पायांचा थरकाप तिला नीट उभ राहूं देत नव्हता. तशीच ती बाहेर आली. अन् रस्त्यावर दूरवर पाहिल—पण कुठ्ठ पत्ता नाही!

आसपासच्या साऱ्या घरांतून शोध केला—पण तरीहि नाहीं! तिचा धीर पूर्णपणे खचला. ती घरांत आली अन् कॉटवर आपला देह लोटून देऊन मोठमोठ्यानं हुंदके देऊं लागली.

तेवढ्यांत प्रभाकरराव आले. सुशीलेच्या जवळ जात ते म्हणाले, "हें काय अस? घाबरूं नकोस मी ह्या चौरस्त्यापर्यंत पुन्हा एकदां पाहून येतो. नाही तर मग पोलीसस्टेशनवर कळवू, अं, रडू नकोस उठ पाहूं!"

प्रभाकररावांच्या आगमनान सुशीलेला बराच धीर आला होता. प्रभाकरराव जानाच सुशीला दारांत उभीं राहिली. तिच्या सोनुकल्यांसाठीं ती व्याकुळ झाली होती. सहजच तिची दृष्टि तिनं आणलेल्या पेरूवर

अन् डाळिंबावर खिळली. तिला अगदी भडभडून आल. "आई मला पेरू पाहिजे आई, माला दाळिंब पायजे लाल लालभडक दाने निगतात ना ते पायजे?"—हे शद्ब तिच्या कानांत घुम लागले अन् पुन: तिचे डोळे अश्रूंनी भरून आले.

त्यांना खोटंच सांगितल की दवाखान्यात जाते अन् येताना पेरू–डाळिंब घेऊन ये म्हणून म्हणाले! दोघानाहि रिक्षात बरोबर न्यायचं सोडून त्यांना सांगितल कीं दवाखान्यांत जाते—दवाखाना! खरंच दवाखान्यांत तर गेली नसतील दोघं? छे. छे:, इतक्या लाब कशी जातील? पण एकदा जाऊन पाहाव तर खरं! तिच्या मनात विचार येण्याचा अवकाश, ती तत्काळ निघाली देखील! फाटकांतच प्रभाकरराव भेटले व तिनं आपली शंका सांगितली!

शंकेचं निरसन कराव ह्या हेतूनं ते दवाखान्यात आले. दुपारचे दोन वाजले होते—जिकडे तिकडे शान्त होत अगदी! बाहेरच्या पेशन्टची गर्दी नव्हती. अन् डॉक्टरसाहेब आपली ड्यूटी संपवून घरी जाण्याच्या तयारीनं आवारात उभ्या असलेल्या मोटारीच्या रोखान चालले होते.

त्यांना सामोरं जाऊन प्रभाकरराव म्हणाले, "डॉक्टरसाहेब माफ करा. पण इथं कुणी दोन मुलं आली आहेत का चुकून?

"दोन मुलं?" प्रभाकररावाकडे निरखून पहात डॉक्टरसाहेब उद्गारले.

"होना! सकाळपासून माझी दोन मुलं कुठतरी चुकून गेली आहेत........पोलीस स्टेशनवर जाण्याच्या अगोदर शक्य तितक्या ठिकाणीं मीच स्वत: तपास करतोय....माझी अरुण अन् माझी अलका कुठं...."

"अलका?" डॉक्टरसाहेबांना खात्री पटत चालली.

डॉक्टरसाहेब परत दवाखान्यांकडे वळले व त्या दोघांना आपल्या खास खोलीकडे नेलं.

उतावीळपणानं दोघहि डॉक्टरांच्याबरोबर गेली.

खोलीच्या दारांतून नर्स पलंगापाशी पाटमोरी बसलेली दिसली. अन् अरुण अलका कॉटवर शांतपणानं एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून झोपली होती!

त्याना पाहतांच सुशीला काळवेळ विसरली ...आपण दवाखान्यांत अनोळखी व्यक्तीसमोर आहोत हेहि विसरली अन् पलंगाकडे धाव घेऊन मुलांच्या अंगावर झेप टाकीत आवेगानं उद्गारली, " माझे छबकडे ते! माझ्या हिरकण्या गऽऽ!"

प्रभाकररावहि जवळ गेले, डॉक्टर अन् नर्स नुसते बघतच राहिले.

अरुणनं डोळे किलकिले करून पाहिलं .. आई? ओऽऽहो अन् त्याचे बाबा देखील! बापरे! त्यान अलकेला गदगद हालवलं. अलकेनं डोळे उघडून पाहिलं अन् आईच्या गळ्याला मिठी घालीत हंसऱ्या डोळ्यांनी पाहात विचार , " आई कुठं गेली होती तू? आनल का दालिंब?"

" हो बेटा! डाळिंब आणल, पेरू आणले—गम्मत गम्मत आणली."

" डाळिंब अन् पेरू?" डाक्टरानी हंसत हंसत विचार .

डॉक्टराकडे पाहात ओशाळून सुशीला म्हणाली, " हो, आज माझ्या ह्या चिमखडीचा वाढदिवस आहे; सकाळींच मी बाजारांत जायला निघाले तशी दोघंहि माझ्या पाठीशीं लागली—मी त्यांना खोटंच सांगितलं कीं मी दवाखान्यांत जाते म्हणून!"

अन् वर पेरू—डाळिंबाचं आमिष दाखवलं—पण लबाडांनीं दवाखान्यांत म्हणजे खरोखरच दवाखान्यांत येऊन पाहिलं कीं!"

" पहा! लहान लहान मुलांच्या ह्या निष्कपट अन् निरागस वृत्तीच्या उदाहरणावरून तरी खोटं बोलं नका ह्यापुढे?" डॉक्टर मनमुरादपणें हंसले. नर्सलाहि आनंद झाला.

तेवढ्यात प्रभाकरराव म्हणाले, " डॉक्टरसाहेब, तुमच्यामुळे माझी मुलं मला चटकन् मिळाली, तुमचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत! बरं झालं पोलीसस्टेशनवर जाण्याच्या अगोदर आम्ही इथ आलो ते!"

" मी देखील वर्दी दिलीच होती. त्याच्या आईसाठी त्यानीं आकांत सुरू करताच मला प्रथम जरा काळजीच वाटली."

तेवढ्यांत आईचा पदर ओढीत अलका म्हणाली, " आई, यांनीं मला खाऊ पन् दिला ग!"

" हो ना! मग त्याचे आभार नाही का मानायचे? अं? त्यांना 'जय हिंद' करा पाहूं!"

अस म्हणताच अरुण–अलकेनं डॉक्टराना अन् नर्सला " जय हिंद" केला!

डॉक्टरानीं कौतुकानं पाहिलं अन् अरुणची जराशी काळजी घ्यायला सांगितल — अन् मग?—मग सुशीला अन् प्रभाकरराव आपल्या चुकलेल्या पाखराना घेऊन वाढदिवस दुप्पट आनन्दान साजरा करायला आपल्या घरकुलाकडे वळले--

" विकास" २७ आगस्ट १९४९

---

८

# रेशानिका



ठण....ठण .. ठण . ठण ..

घड्याळांत दहाचे ठोके पडले ..ऑफिसर्चा माणसं टायची गांठ नीट जमली आहे कीं नाहीं ते पुन्हां एकदां आरशांत पहात खुंटीवरची हॅट घेऊन ऑफिसला निघत होती दहा वाजले . वकील लोक आपला काळा गाऊन उगीचच फडकावीत रिक्षातून ताठ्याने जात होते .. दहा वाजले ...दोन पैसे मसाला पानाची लालभडक पिचकारी टाकीत कारकून लोक हेडक्लार्कची मर्जी खप्पा होऊं नये म्हणून लगबगीनं ऑफिसची वाट धरीत होते .. दहा वाजले . मुलीच्या शाळेची घंटा होतांच त्या उर्दू शाळेंतल्या पोरी आपल्या रंगीबेरंगी ओढण्या सांवरीत इकडून तिकडे धांवत होत्या....

ह्याच शाळेपासून पन्नास एक यार्डावर एक निळ्या रंगाची छोटीशी बंगली हिरव्या हिरव्या वेलींच्या आडून डोकावीत आहे. तिच्या पुढच्या व्हरांड्याच्या दोन्ही बाजूला मधुमालतीची झाड आहेत अन् पायऱ्यांजवळ गुलाबाचीं तीन चार रोपटी आहेत. ह्याच पायऱ्यांवरून बरोबर दहा वाजतां लोकरीच्या कापडाचा सूट घातलेला एक तरुण पायांतले बूट खाड खाड वाजवीत जात आहे. अन् थांबा.. .त्याच्यानंतर पंधरा मिनिटांनीं त्याच पायऱ्यावरून किट किट असा सँडल्सचा आवाज करीत जाणारी ती

युवती पहा ... ...गुलाबी साडी, पांढरा ब्लाऊझ, निळसर रुमाल, चॉकलेटी पर्स अन् काळ्या सॅंडल्स. ..मोराच्या पिसाऱ्यांतल्या विविध रंगांप्रमाणेच हे सारे रंग उठून दिसत आहेत... तिचं नांव रेशनिका ! हं ! दचकूं नका ! तिचं नांव रेशनिका ! कॉलेजच्या केवळ एक वर्षाच्या वास्तव्यांत तिचं नाव होतं "कॉलेज क्वीन्" ! अन् रेशनिंग ऑफिस-मधल्या ह्या चार वर्षांच्या काळात तिचं नांव पडलय 'रेशनिका'! इंग्रजी अन् मराठी ह्यांचा विचित्र संगम करून ठेवलेलं हे नाव तिला शोभतं कीं नाहीं हें कांहीं समजत नाहीं—तिला ते आवडतं कीं नाहीं ते तर मुळींच सांगतां येणार नाहीं !

जातां जातां रोजच्या प्रमाणेच तो म्हणाला, "अच्छा! बरोबर ५॥ ला येईन हं! जाऊं मी?"

अन् उत्तरादाखल तिन फक्त एक गोडसा मुरका मारला!

रिक्षा आली अन् रोजच्यासारखीच ती आपली साडी सांवरीत रिक्षांत बसली. रिक्षावाल्याला रोजच्याप्रमाणेच ती रिक्षांत बसल्यावर थोडासा अत्तराचा, थोडासा वेणींतल्या फुलांचा अन् थोडासा तोंडाला लावलेल्या पावडरचा वास आला.

ऑफिसमध्यें गेल्यावर ती अगोदर 'लेडीज रूम'मध्यें गेली. पर्स-मधल्या छोट्याशा आरशांत आपला चेहरा न्याहाळून पाहिला अन् मग ती आपल्या सेक्शनकडे वळली.

तिचा बॉस तिच्यावर खूष होता अगदीं! भलताच अर्थ काढूं नका हं! ती विवाहित होती अन् तो तर पेन्शन अन् पन्नाशीं जवळ आलेला वयस्कर माणूस होता. तिच्या कामावर तो फार खुष होता. तिचं ते प्रामा-णिकपणाच काम, सगळ्यांशी गोड बोलणं, अन् कार्डासाठीं अगर इतर

कां कामासाठींही आलेल्या माणसांना जास्त खेपा न करायला लावतां त्याचं चटकन् काम करून देणं—अशा प्रकारच्या तिच्या वागण्यावर तिचा साहेब खूष होता ह्यासाठीच !

एक वाजला—शनिवार असल्यामुळे आज दोनला ऑफिस सुटणार होत. ती आपल्या टेबलावरची फायलींचीं वाडं आवरूं लागली. घरी जाण्याचे वेध सगळ्यांना एक तासापासूनच लागले होते. तिनं फायली रचून ठेवल्या अन् तेवढ्यात हुसेन चपराशी तिच्याजवळ येऊन म्हाणाला, " आपको साहब बुलाते हैं. "

तिला थोडासा राग आला. पण तिनं तो दाखवला नाहीं. तशीच ती साहेबांच्या 'स्पेशल रूम' कडे गेली. मखलं स्प्रिंगचं अर्ध दार हळूच लोटलं अन् साहेबाच्या टेबलाजवळ अदबीनं उभी राहिली.

एका भिंगाचा चष्मा नाकावरून काढून घेत साहेब म्हणाले, " हे पहा मिसेस् पटवर्धन, आजच्या सगळ्या ' परमिटस् ' च्या ' एन्ट्रीज ' करून ठेवा. हें काम मी तुमच्यावर मुद्दाम सोंपवीत आहे. समजलं ? ' कम्लीट ' करा हं आज ! "

मनांतला राग चेहऱ्यावर दिसूं न देतां ती परत ' सेक्शन ' मध्यें आली. भराभरी 'एन्ट्रीज' लिहित असतांना शेजारच्या गृहस्थांना धुसफुसत ती म्हणाली " पाहिलंत ना ? आज सकाळपासून मान वर करायला वेळ नाहीं मिळाला मला ! अन् साहेबांनीं आता हे काम सोपवलय् आणखी !" खरं म्हणजे ती कामाला कधींच कंटाळत नसे. आजही तिनं ते काम चट-कन् केलं असतं पण घरी गेल्यावर आज तिला छानपैकी बटाटेवडे करायचे होते सकाळीच तिनं कुकरमध्ये बटाटे उकडूनही ठेवले होते. पण—तिला आता उशीर होणार होता. तिला काही सुचेना. सगळ्या

फायलींच्या कागदांवर तिला ते खुशखुशीत, खमंग अन् खुमासदार बटाटेवडे दिसूं लागले .

ती 'लेट' बसली. काम पुरं केलं अन् घरी आली. घरी आल्यावर तिनं पाहिलं तो रखमा मोलकरीण सारं काम करून गेली होती अन् तिचे 'हे' स्टो पेटवून चहा करीत होते.

तिनं तोंड धुतलं—साडी बदलली अन् दोन कप चहा गाळला. आठ तास काम करूनही रोज तिच्या चेहऱ्यावर दिसणारा उत्साह अन् तजेला आज पार नाहींसा झाला होता,

चहा घेऊन तिनं कॉटवर अंग टाकलं. तो म्हणाला, "दमलीस?"

"ऊऽऽऽहूं!" तिनं नकार दिला.

"मग"

"कांहीं नाही" तिनं टाळाटाळ केली.

"आज काम फार होतं होय?"

तिच्या अंतःकरणाला हा प्रश्न जाऊन भिडला.

"दुष्ट आहे अगदीं!" एवढंच ती रुद्ध कंठानं म्हणाली.

"कोण ग?"

"साहेब! अन् दुसरं कोण? म्हटलं आज बटाटेवडे करीन. पण नाहीं. त्याच्या कामापुढें आमचे सारे बेत मनातल्या मनातच रहातात."

"अस्सं! म्हणून राणीसरकार रागावल्यात होय?" हसूं दाबीत तो म्हणाला. अन् मग तिच्या कोमजलेल्या गालांचे गुलाब पुन्हां टवटवीत झाले.

तिच्या जवळ येत तो म्हणाला, "जाऊं दे तुझ्या त्या तिखट बटाटे-वड्यापेक्षा हे गोड गोड गुलाबजामच छान आहेत बुवा!"

ती लाजली....आनन्दली. ..अन् खुदकन् हंसली.

बटाट्यांचे वडे होण्याऐवजीं शेवटीं रात्रींच्या स्वैयपाकांत त्यांची भाजीच झाली ! ! !

जेवतांना तो तिला म्हणाला, " आतां आपण स्वैंपाकीण ठेवूं या एक. अं ऽऽ "

" इश्श, दोन माणसांचा स्वैंपाक तो काय ? करायचीय् काय स्वैंपाकीण ? काहीं नको, मीच करीत जाईन. "

" पण तूं दमून जातेस ग फार " तो म्हणाला.

" छे, हो, दमत नाही, कांहीं नाही. पण साहेबानं असं माझ्या बेतावर पाणी पाडलं कीं मग राग येतो मला ! छेः, छेः, स्वैंपाकाचं 'डिपार्टमेंट' मी नाहीं हं दुसऱ्या कुणाच्या ताब्यांत जाऊं देणार ! "

" तू किती चांगली आहेस ग ! "

" अंऽऽऽहं. तुम्हीच माझ्यापेक्षां जास्त चांगले आहांत ! "

× × ××

रात्रीचे दहा वाजले होते. 'फ्रीप्रेस'चा अंक वाचीत ती आराम खुर्चीवर पडली होती,

जांभई देत तो म्हणाला, ' उद्यां रविवार ! '

पंधरा वर्षांच्या जेहलमला नूरजहाँ आपली आई नाहीं असं कळल्यानंतर होणारं दुःख अन् त्यानंतर तिच्या मनांत येणारे असंख्य विचार ज्या प्रकरणात निवेदित केले होते ते प्रकरण ती वाचीत होती.

पुनः पुनः तिचे डोळे अश्रूंनीं भरून येत होते अन् पुनः पुनः समोरचीं अक्षरं अंधुक होत होतीं. पण....

'उद्यां रविवार!' हे शब्द कांनीं पडतांच ती जेहलम व तिचे दुःख विसरली.—अन् पुस्तक हातावेगळं करीत आनंदानं म्हणाली, "हो! उद्यां रविवार!"

रविवारच्या सुट्टीनं त्याला होणारा आनंद अन् तिनं तेच शब्द उच्चारून त्याला केलेली सांथ—बासुंदीला पिस्ते अन् चारोळ्यांचीच जोड जणूं कांहीं!

उद्यां रोजच्यापेक्षां खूप उशीरा उठायचं असं ठरवून ती निजली. अन् पूर्वेकडच्या खिडकींतून येणाऱ्या सूर्यकिरणांनी तिला रोजच्याच वेळीं उठवलं!!

निसर्गाच्या ह्या असहकाराची तिला मोठी गम्मत वाटली!

तिनं चहा केला. पुन्हा नऊ वाजता दुसऱ्यांदा चहा केला.

चहा अन् टोस्टवर ते दोघं ताव मारीत असतानांच बाहेरच्या दारावरची घंटा वाजली अन् त्या पाठोपाठ 'साब' 'साब' अशा हांकाही ऐकू आल्या.

ऑफिसचा चपराशीं बाहेर उभा होता. तो बाहेर गेला. अन् चपराशानं त्याला एक कागदाचं चिटोरं दाखवलं. 'जादा' कामाला हजर राहाण्यासाठीं ऑर्डर होती ती!

तिच्या आनन्दावर पुन्हा विरजण पडलं.

घाईनं स्वयंपाक करून गडबडीनंच तिनं पतिराजांना जेवायला वाढलं.

बारा वाजतां सगळं काम आटोपून ती जेवत असतांनाच तिची एक जिवा भावाची मैत्रीण तिला भेटायला आली.

"हें काय? आज राजाराणी मजेंत जेवण्याऐवजीं तूं एकटीच काय बसलीस?" मैत्रीणीनं विचारलं.

" अग, पूर्वीच्या काळी राजा शिकारीला गेला कीं राणीला विरह भोगायला लागायचा! आजकाल रविवारी पुरुषांना ऑफिसला जावं लागलं की बायकांना विरह सहन करायला लागतोय्!"

तिच्या ह्या बोलण्यावर मैत्रीण खो खो हंसत सुटली.

" अशी गंभीर होऊ नकोस गडे. आज आपण पिक्चरला जाऊं या. तुलाही बरं वाटेल अन् वेळही जाईल. कबूल?"

सिनेमाच्या आनंदांत तिनं जेवण उरकलं. अन् कपडे करून त्या एकच्या मॅटिनीला गेल्या.

सिनेमा पाहिल्यावर त्या ' आराम ' मध्ये गेल्या. कटलेट खाल्लं, पुलाव खाल्ला अन् ' घे ग, ' ' नको ग ' चा आग्रह करता करता 'क्रिमी फ्रूट' चीही ऑर्डर दिली.

संध्याकाळी ती घरीं आली. तो ५॥ ला आला.

त्यान विचारलं, " कसा गेला रविवार?"

" छान! आपण ऑफीसमध्ये जायच अन् वर आम्हाला विचारायचं कसा गेला रविवार "

त्याची हॅट तिन घेतली अन् स्टँडला अडकवली. कोट घेतला अन् हँगरला अडकवला.

" पण हे बघ " पायातले बूट काढता काढता तो म्हणाला, " आजचा रविवार काही फुकट गेला नाही. मंगळवारी मला ' ऑफ ' मिळणार. पण काय उपयोग? तो दिवस तर आमच्या राणीसरकार मोठमोठ्या फायलींच्या सहवासांत घालवणार. "

त्याला वाईट वाटलं. तिलाही वाईट वाटलं.

× × ×

....मंगळवार आला. दहा वाजले. ती पायऱ्यांजवळ आली. तो देखील आला. त्यानं एक टपोरं गुलाबाचं फूल तोडलं अन् तिच्यासमोर धरलं. रुमाल अन् पर्स सावरीत तिनं ते हंसत हंसत शेपट्यांत खोवलं.

“ बरं, साडे पांचला येईन हं ” ती म्हणाली.

“ अच्छा ! ”

अन् मग त्यानं चांगली दोन तास झोंप घेतली. त्यांच्या शेजारीं एक पेन्शनर गृहस्थ रहात होते. त्यांच्याकडे जाऊन पाच वाजेपर्यंत पत्ते कुटले. पांचचे ठोके पडले अन् त्याला आठवण झाली. ती साडेपाचला येईन म्हणाली होती.

“ चला बुवा, आतां कंटाळा आला. ” आळस देत तो उठला.

“ अहो थांबा, आणखी फक्त एकच रबर. ” ते गृहस्थ म्हणाले.

पण तो चालायलाच लागला .......

घरीं येऊन त्यानं स्टो पेटवला. स्वैंपाकघरांतल्या जाळीच्या कपाटांत ठेवलेला चिवडा येतां जातां खाल्ला. पलीकडे काजूची बरणी होती त्यांतले थोडेसे काजूहि खाल्ले.

साडेपांच झाले अन् हंसतच ती रिक्षांतून उतरली.

“ कशी गेली आजची सुटी ? ”

“ छान ! आपण ऑफिसला जायचं अन् वर विचारायचं कशी गेली सुटी ? ”

“ असं ! माझेच शद्ब मला परत केलेत होय ? ”

“ असं काय ? रागावूं नकोस. आणखी आठ दिवसांनीं ‘ईद’ची सुटी आहे. त्या दिवशीं आपण खूप मजा करूं या ! ”

सहारा वाळवंटांतल्या प्रवाशाला हिरवळीला पाहून जसा आनंद व्हायचा तसाच तिला कॅलेंडरांतील लाल आंकडे पाहून व्हायचा! तिला काय ईदची सुटी कधीं आहे ते माहीत नव्हतं होय?

ती हंसली व म्हणाली, "हो खरंच! आतां ती सुटी मात्र आपण दोघांनीं मिळून मजेंत घालवावयाची हं!"

अन् रोजच्या यंत्रासारख्या कार्यक्रमांत आठ दिवस भुर्रकन् निघून गेले अन् मगळवारी 'ईद' मुळे सारीं ऑफिस, कोर्टं, कचेऱ्या बंद राहिल्या. सकाळीं ती म्हणाली, "आज काहीं तरी गोड करणार मी!"

"कां? ईद कांहीं आपला सण नव्हे!"

"तस नाहीं पण आज सुट्टी आहे. सुट्टी म्हणजे सणच कीं आपल्यासारख्यांना!"

"वा! वा!" तो हंसला.

"सांगा गडे, तुमच्या आवडीचं करते कांहीं तरी!"

"अं ऽ ऽ हं! तुझ्याच आवडीचं कर."

"वा! वा! असं काय ते? मग असं करूं या! तुमच्या अन् माझ्या दोघांच्या मिळून आवडीचं करूं या! मग तर झालं?"

"हं! ही कल्पना छान!"

तिनं क्षणभर विचार केला अन् टाळी वाजवून ती म्हणाली, "छान! खव्याच्या पोळ्या करतें आज! कसं?"

"वा! वा! फार छान बेत!"

अन् तिनं खूप मेहनत करून खव्याच्या पोळया केल्या. राजा–राणी मजेंत जेवले. जेवण झाल्यावर विडे खाल्ले, थोड्या वेळानं ती म्हणाली, "आतां पुढचा कार्यक्रम—"

" पुढचा कार्यक्रम........पुढचा कार्यक्रम....पुढचा कार्यक्रम 'चूल अन् मूल!' "

ती खूष झाली अन् ते दोघं सिनेमाला गेले.

सहा वाजतां शो संपला; थिएटरच्या बाहेर आल्यावर ती म्हणाली, " मला थोडी खरेदी करायचीय गडे! "

" काय घ्यायचंय् तुला ? "

" तसं कांहीं विशेष नाहीं. "

इतक्यांत समोरच्या फुटपाथवरचे आर्टसिल्कच्या साड्यांचं दुकान सहजच तिनं पाहिलं. त्या रंगीबेरंगी रेशमी साड्या पाहून ती हुरळून गेली. नकळतच तिचीं पावलं त्या दुकानाकडे वळलीं. त्यालाही तिच्याबरोबर जावं लागलं.

तो म्हणाला, " घे कीं तुझ्या आवडीची ! "

ती म्हणाली, " नको बाई ! " पण करतां काय पतिराजांचा फारच आग्रह पडला अन् नाईलाजान [ ? ] तिनं एक साडी घेतली.

घरीं येतां येतां तो म्हणाला, " कशी गेली आजची सुटी ? "

रेशमी साडीची घडी हृदयाजवळ धरीत ती म्हणाली, " मजेत ! "

रात्र झाली अन् रात्रीला पाठीशीं घालून दिवसही उजाडला.

× × ×

दहा वाजले— दोन पैसे मसाला पानांची लालभडक पिचकारी टाकीत कारकून लोक हेडक्लार्कची मर्जी खप्पा होऊं नये म्हणून लगबगीनं ऑफिसला जात होते. दहा वाजले— उर्दू शाळेची घंटा होतांच आपल्या रंगीबेरंगी ओढण्या सांवरीत त्या चिमण्या पोरी इकडून तिकडे धांवत होत्या—

अन् ह्याच शाळेपासून ५० यार्डांवर असलेल्या छोटयाशा निळ्या बंगलींतून लोकरीचा एक तरुण पायांतले बूट खाड् खाड् वाजवीत पायऱ्या उतरत होता अन् त्याच्यानंतर पंधरा मिनिटांनीं सँडल्सचा किट्‌किट् असा आवाज करीत रेशनिका ऑफिसला जात होती.

"माधुरी" मार्च १९४९

